# गरमा गरम चिवडा



सावरकर भवन, राजा ठाकूर पथ, शनिवार पेठ, पुणे.

दूरध्वनी :+९१२०२५५४४७५१

इंटरनेट अधिकार :- स्वा. सावरकर राष्ट्रीय स्मारक

स्वा. सावरकर मार्ग, दादर, मुंबई ४०००२८.

**प्रकल्प संचालक : रणजित विक्रम सावरकर**

प्रकल्प समन्वयक : अशोक रामचंद्र शिंदे

हे पुस्तक आसामी, बंगाली, इंग्रजी, गुजराथी, हिंदी, कन्नड, मल्याळम, मराठी, ओडिया, पंजाबी, तमिळ, तेलुगु या भाषांमध्ये उपलब्ध आहे.

# गरमा गरम चिवडा

## (१)

## महमंद अल्ली नि हसन निजामी यांची लाथाळी

महंमद अल्ली आणि हसन निजामी यांची प्रेक्षणीय लाथाळी दिवसेंदिवस खूपच रंगात येत चालली आहे. परवाच्या डावात तर महमंद अल्लींची लाथ अगदी अचूक निजामींच्या नाकाच्या अगदी बोंडीवर जाऊन बसली! हुतात्मा श्रध्दानंदांच्या हत्येने चिडून काही क्रुद्ध हिंदू हसन निजामी यांची खोड मोडणार आहेत, असा धाक पाडून हसन निजामी आजकाल शक्यतवर आपल्याघराचे किल्ल्यात बसूनच मुसलमानांची जी काय उन्नति करिता येईल ती करत आहेत, ही गोष्ट दिल्लीच्या बाजारात बहुतेकांच्या कानावर आलेलीच होती. पण अल्लींनी ती उभ्या हिंदुस्थानच्या कानावर घालण्यासाठी परवा निजामीवर प्रकटपणे उपाधिवर्षाव केला! त्यात त्यांनी खालील पदव्या निजामीसाहेबास अपर्ण केल्या. ”सरकारी हेर! निजमांचे अन्न खाऊन त्यांच्याच विरुद्ध, सरकारकडे चुगल्या करणारा, निमक हराम! श्रद्धानंदांच्या हत्येनंतर भयभीत होऊन घरात दडून बसलेला भ्याड!“

या पदवीदानाचा स्वीकार केल्यानंतर अल्लीहून तरी आपण काही अधिक भ्याड नाही हे सिद्ध करण्यासाठी, महंमद अल्ली जसे अबदुल रशीदला बंदिगृहात जाउन भेटून आले तसे निजामीही घराबाहर पडून बंदिगृहाकडे भेटावयास गेले, पण अर्थात्च दहा-पांच शरीररक्षकांच्या मंडलात आपला बिनमोल देह स्थापन करून!

***

श्रद्धानंदांची हत्या हें एका व्यक्तिचें कृत्य आहे; अशा प्रवृत्तीविषयी मुसामान समाजास दोष देऊ नका, ही महात्मा गांधींची दिव्यवाणी किती अर्थपूर्ण होती हे प्रथम कोणा कोणास कळलें नव्हते ते म्हणाले, ‘मुसलमानांची मनोवृत्ती ओळखण्या इतके गांधीजी चाणाक्ष नाहीत’. पण आता ती त्यांची चूक होती आणि गांधीजींच्या दिव्य दृष्टीस दिसले तेच सत्य होते, हे प्रत्यही घडणाऱ्या मुसलमानी घटनांवरुन सिद्ध होत आहे! उदाहरणार्थ खालील घटना पाहून जाफरीअल्ली म्हणाले, ‘गाझी रशीदची तलवार मी चुंबिली असती! -जर आज मुसलमानी राज्य असते!’ कलकत्त्याच्या नगरसंस्थेत (म्युनसिपालिटीत) श्रद्धानंदांच्या मृत्यूविषयी खेद व्यक्त करणाऱ्या ठरावास मुसलमानांनी एकजात अडथळा केला. मिरतच्या मशिदीतून मुसलमानांनी ती हत्येची बातमी ऐकताच दिपोत्सव केला. गोरखपूरला मुसलमानांनी मिठाई वाटली. दिल्लीच्या जुम्मा मशिदीत हाजी महंमद अल्लींनी गाझी रशीदला ह्या खटल्यातून निर्दोष होऊन सुटता यावे म्हणून

सार्वजनिक प्रार्थना केल्या. पेशावर पासून तो महाराष्ट्रातील लहानसहान जिल्ह्यांच्या गावापर्यंत मुसलमानांतून रशीदचा खटला लढविण्यासाठी निधी जमविण्यात आला. कोठेही महत्वाच्या अशा मुसलमानांच्या सभा श्रद्धानंदांच्या हत्येविषयी खेद प्रदर्शित करण्यास झाल्या नाहीत. अनेक ठिकाणी हरताळाचे दिवशी मुसलमानांनी आपली दुकाने बंद ठेवण्याचे नाकारिले मुसलमानांच्या कित्येक प्रमुख पत्रांतून श्रद्धानंदांच्या हत्येविषयी टर उडविणारे उद्‌गार काढण्यात आले. एकाने लिहिले की, बहुधा श्रद्धानंदांच्या सेवकाने (ज्याने त्यांचा प्राण वाचविण्याचे कार्यी स्वतःही घायळ करून घेतले त्याने) बहुधा त्यांची हत्या केली असावी आणि मग रशीदला निष्कारण पकडले असावे. दुसऱ्याने लिहिले, अजी जनाब ऐसा नहीं! 'एवीतेवी श्रद्धानंद रोगाने मरणारच आहेत असे पाहून त्या रोगाच्या अत्यवस्थ स्थितीत हिंदूनी विचार केला की, ह्यांना गोळी घालून मारून हुतात्माच का न करा? मुसलमानांवर आग पाखडण्यास ही उत्तम संधी आहे!' आणि हिंदूंनी विचार करून श्रद्धानंदास स्वतःच गोळी घालून मारिले! जाफरअल्लीने लिहिले, 'श्रद्धांनद गायीच्या जन्मास आले देखील'. आणि कोण्या मुसलमानी कसायाच्या खुंट्याची शपथ आहे, सांगा की श्रद्धानंदास मारणाऱ्या प्रवृत्तीचा सर्व दोष एका एकुलत्या व्यक्तिवरच असून त्याविषयी मुसलमान समाजातील मोठ्या भागाला दोषी धरू नका, हे आपल्या या गांधीजींचे मत किती न्यायसंगत आणि सत्य होते ते! अगदी चटकन् सत्य त्यांच्या दिव्य दृष्टीस दिसून आले! एका क्षणाचाही विचार करावा लागला नाही! महात्माच तो! खरा खरा अंतर्ज्ञानी!'

अशा अंतर्ज्ञानी आणि दिव्यदृष्टि पुढाऱ्याचे हाती राष्ट्राची सूत्रे सोपवून त्यास 'सर्वाधिकारी' (डिक्टेटर) नेमले म्हणूनच तर लोकमान्यांचे मृत्यूनंतर एका चार वर्षात हिंदुस्थानात राजकारण आणि धर्मकारण इतके रंगारुपास आले! जिकडे पहावे तिकडे एकीच एकी, उन्नतिच, जागृती, तेजच तेज!

केवळ हे हिंदुसंघटन तेवढे, काय मुर्दाडपणा करीत असेल ते असेल! जर का हे संघटनही मध्ये आले नसते तर या 'सर्वाधिकाऱ्याच्या अंतर्ज्ञानाने' प्रेरित झालेल्या ह्या तेजाने आज हिंदुस्थान, निदान हिंदुजाती, स्वतः उभीच्या उभी जळू लागली असती, जळू!

***

मागे एकदा महंमद अल्ली म्हणाले, 'अब्न साउदच्या विरूद्ध जी गाऱ्हाणी आहेत, ती खरी ठरली तर मी स्वतः जाउन अब्न साउदच्या विरूद्ध लढत मरेन!' अल्ली तिकडे गेले, गाऱ्हाणी खरी ठरली. अब्न साउदविरूद्ध लढाई सुरू झाली पण अल्ली जिवंतचे जिवंत परत आले. त्यांच्यावर दारूगोळा व्यय करण्या इतका रिकामटेकडा शिपाई अब्न साउदच्या सैन्यात कोणीदेखील भेटला नाही. त्यांच्यावर त्यांना मारून टाकण्याचा देखील कोणी उपकार करीना! खरोखर अब्न साउदचे लोक मोठे दुष्ट आहेत!

पुढे श्रद्धानंदजींच्या मृत्यूनंतर महंमद अल्ली म्हणाले, 'आता ह्या पापाचे प्रायश्चित माझे स्वतःचे रक्त सांडून होत असेल तर मी ते आंनदाने करीन.' पण अब्न साउदसारख्या दुष्टांची गोष्ट तर दूरच; पण दानशूर म्हणून गाजलेल्या हिंदू लोकांतही कोणी एवढा उपकार श्रद्धानंदांचे नावाने देखील अल्लींवर करीना. तेव्हा अल्लींच्या पदरी तेही पुण्य पडले नाही!

म्हणून आता चीनच्या विरूद्ध सैन्य धाडण्याचा निषेध करण्यास्तव भरलेल्या एका सभेत महंमदअल्लींनी सगळ्या जगाला पुनः एकदा स्वतः मरण्याचा धाक घातला होता! चीनला जर सैन्य धाडाल तर ज्या आगगाडीने जे जाईल तिच्या रुळावर मी पडेन आणि माझ्या छातीवरून ती आगगाडी जाईतो उठणार नाही म्हणून ते गर्जले. रीतीप्रमाणे टाळ्या पडल्या आणि महंमद अल्ली आता मात्र वाचत नाहीत अशी आम्हांस धास्ती पडली कारण चीनला सैन्य हे जाणारच! महंमद अल्ली मरणार, आता जगाचे कसे होईल म्हणून उद्विग्न असता एकाच पत्रात दोन्ही बातम्या वाचल्या! चीनला सैन्य गेले आणि महंमद अल्लीने जुम्मा मशिदीत हिंदु लोकांस आणि हसन निजामीस शिव्यांची लाखोली वाहिलेले भाषण केले! महंमद अल्लींची मरणाची गाडी तिसऱ्यांदा हुकली! पण हे झाले कसे हे काही कळेना!

क्वचित् असे झाले असेल की, चीनचे सैन्य आगगाडीत बसून निघतांना हा सत्यप्रतिज्ञ महावीर महंमद अल्ली आगगाडीच्या रुळावर पडण्यास गेला असेल पण रुळावर न पडता घाईघाईत रुळांचे मधोमध पडल्याने रुळावरून गाडी निघून गेली तरी त्याचा प्राण काही गेला नाही. मरावे कसे याची देखील माहिती असावी लागते! आता हा तिसरा योग तर गेला, आता पाहू मरणाचा चौथा डोहळा महंमद अल्लीस कोणत्या प्रकारचा होतो ते. भीती एवढीच की, लांडगा आला, लांडगा आला! असे गमतीने म्हणता म्हणता लांडगा खरोखरीच एखादे वेळी आला नाही म्हणजे झाले?

***

पंडित मोतीलाल नेहरु नि डॉ किश्चुल आदि कित्येक निस्सीम देशभक्त पुढाऱ्यांनी पुनः वकिली सुरू करण्याचे ठरविले आहे. ठीकच आहे. वकिली सोडून जो देशोद्धार व्हावयाचा तो झालाच आहे. एका वर्षात स्वराज्य मिळून पुनः निघून देखील गेले! तेव्हा आता ज्यांनी त्यांनी आपापले पोटापाण्याचे उद्योग पहावे हे साहाजिकच आहे. वकिली वाईट म्हणून आपण वकिली थोडीच सोडली होती. लोक तिला वाईट म्हणत आणि लोकांवाचून पुढारी कोणाचे व्हावयाचे ते कळेना म्हणुन वकिली सोडली होती. आता लोक तसे फारसे म्हणत नाहीत आणि वकिली आणि पुढारीपण हे दोन्हीही तीर आपल्या मोठेपणाच्या भात्यात राहू शकतात. तेव्हा आता वकिली सुरू करण्यास काय प्रत्यवाय आहे?

- श्रद्धानंद, दि. ३ मार्च १९९२

# २. पत्वाखाली सत्याग्रहाला आठ महिने झाले

पत्वाखालीचा सत्याग्रह आतापर्यंत अगदी नियमाने चालत आलेला आहे. मध्यंतरी सत्याग्रह करण्यासाठी आपले गुरखे बंधुही गेल्याची वार्ता 'श्रद्धानंदा'त आपण सर्वांनी वाचलीच आहे. शेवटी नमःशूद्र म्हणजे (नामशूद्रांनी) बंगालमधील आजपर्यंत अस्पृश्यांतील अस्पृश्य गणल्या गेलेल्या आपल्या हिंदु बंधूनीही ह्या सत्याग्रहास त्यांच्या जातीचे ५ स्वयंसैनिक पाठवून हिंदु जातीच्या झगड्यात आपली स्वतःची वर्गणी सादर केली. श्रीहरीच्या ध्वजाखाली हिंदूधर्माचे रक्षणार्थ रणक्षेत्रात स्पृश्यांबरोबर जे खांद्यास खांदा लावून झुंजले, त्यांची अस्पृश्यता भस्म झालेली आहे. आता 'तुम्ही सकल हिंदू, बंधु बंधु!'

हा पत्वाखालीचा सत्याग्रह आरंभ होऊन आता आठ महिने होत आलेत. प्रत्यही दहा-पाच हिंदु स्वयंसैनिकांसह भजनाची मिरवणूक निघते मशिदीपर्यंत पोचतो हरिनामाचे गजराने त्या गावचे वातावरण दुमदुमवून हेते आणि अंती सशस्त्र शिपाई येऊन त्यास धरीपर्यंत स्वयंसैनिक वाद्ये वाजवीत आणि हरिनामाचा घोष करीत मशिदीपुढील राजमार्गाने पुढे घुसतात. लगेच दुसरे दिवशी पुनः दुसरे भजनवीर हाच क्रम पुढ चालवितात. शेकडो तुरूंगात गेले, अन्नत्याग झाले. मुसलमानी गुंडांचे दंगे झाले; डोकी फुटली; ज्यादा पोलिस बसले; त्यांच्या करासाठी लिलाव पुकारले; गव्हर्नर फणफणले; मुसलमान जळफळले; पण हिंदूंचे हरिकिर्तन आणि सत्याग्रह जशाचा तसा चालू आहे!

मुसलमानांनी नसता दुराग्रह धरिला नसता तर ज्या मशिदीवरून हिंदूंच्या वाद्यांची मिरवणूक वर्षातूनही एखादे वेळी क्वचितच जाती, त्याच मशिदीवरून तोच दुराग्रह मुसमानांनी धरताच, हिंदूच्या सत्याग्रहाची वाद्ये आठ महिने सारखी झडत आहेत. भजनाचे जयघोष सारखे उठत आहेत, मिरवणूकी त्या मार्गावरून सारख्या वाजत गाजत जात आहेत! ह्याला म्हणतात चिकाटी!!!

अशी चिकाटी थोडी फार तरी ह्या हिंदूत आहे म्हणूनच तर ते धकाधकीच्या मामल्यांत हजारो वर्षे 'जीता रहा है'! आणखी हजारो वर्षे 'जीता रहनेवाला है!' हे आमच्या 'रहिम चाचांनी' पक्के समजून असावे.

रहिमचाचा आजपर्यंत बंगालमध्ये मुसलमान गुंड जेव्हा हिंदू कुमारिकांस घरातून बलात्काराने धरून किंवा मार्गाने चोरून पळवून नेत म्हणून बातम्या ऐकत तेव्हा चकार शब्दही काढीत नसत आणि कदाचित् त्यांच्या 'मी बंगाल दुसरा पंजाब करीन' ह्या आसुरी प्रतिज्ञाप्रमाणे हळूहळू बंगालमध्ये दृश्य दिसू लागले ह्याने मनात फिदी फिदी हसतही असतील. ह्याच आठवड्यात बैत्कल ठाण्याच्या अन्तर्गत कपूरकठीच्या एका इकलमयी नावाच्या विवाहित हिंदू ललनेस मुसलमान गुंडांनी तिच्या बापाच्या घरावर छापा घालून बलात्काराने मार्च ११ दिनांकास रात्री पळवून नेले म्हणून 'स्वतंत्र' दैनिकात २८ व्या मार्चची बारिसालची तार आहे. पोलिसला बातमी दिली, पण अजून मुलीचा पत्ता नाही! काय, रहिमचाचा खुदकन हसलेतसे?

पण रहिमचाचा, थोडे थांबा, ही पहा दुसरी एक तार आली आहे! तेवढीही वाचून टाकू आणि मग एकदम हसू या! जिल्हा सिल्हट कसबा अच्छामती येथे फयाज अल्ली नावाचा एक मुसलमानी गुंड हिंदू स्त्रीयांचा येता जाता उपमर्द करावयास सवकला होता. तो एका हिंदू स्त्रीचे घराही अशा नेहमीच्या धिटाईने जो घुसू लागला तो गेल्या आठवड्यात एक दिवशी शशिमोहन नावाच्या एका बंगाली नवयुवकाने त्याचा शेवट करून टाकिला. त्याला अचानक ठार मारून टाकिले. 'आनंद बझार पत्रिका' म्हणते की शशिमोहनने आपल्या कथनात सांगितले आहे की, 'हिंदू स्त्रियांच्या सन्मान आणि सतीत्वरक्षणासाठी मी त्या अधमास कापन काढिले'.

ऐकलेत ना, रहिमचाचा? शशिमोहन हा त्या तुमच्या खिदिखिदि हसणाऱ्या ध्वनीचा केवळ पडसाद उठलेला आहे; नाही का? अजून जपा. इंग्लिशांच्या मशीनगन्सच्या आणि तोफांच्या तोंडातून निघणाऱ्या ज्वालाग्राही गडगडाटाने जे कंपित झाले नाही आणि वेळप्रसंगी जे ब्रिटिश सिंहाच्या गव्हर्नर जनरली दाढीस हात घालून तिला उपटण्यास कचरले नाही, ते हे हिंदु युवकांचे धैर्य आहे. तेथे चाचाजी, तुमच्यातील गुंडगीर दाढीची काय कथा! आजवर तुमच्या खिदिखिदि हसण्याकडे हिंदु शशिमोहननी लक्ष दिले नाही, ते त्यास तुमचे भय वाटत होते म्हणून नव्हे. हे पूर्वीही सांगितले होते. पुनः सांगतो, ऐका, नीट ऐका, रहिमचाचा, शशिमोहन काय म्हणतो, ते नीट ऐका! 'मी माझ्या हिंदू भगिनींच्या सन्मान आणि सतीत्व रक्षणासाठी त्या अधमास कापून काढिले.'

हिंदू स्त्रियांकडे पाहून खिदिखिदि हसणाऱ्या तुमच्या धर्मवेड्या गुंडगिरीचा हा शशिमोहन पहिला हिंदु प्रतिध्वनी आहे! रहिमचाचा, अजून तरी शुद्धीवर या. कारण तुमच्या हसण्याच्या प्रत्येक ध्वनीमागोमाग ह्यापुढे शशिमोहनी प्रतिध्वनी गर्जत उठतील असा संभव, क्रियेनंतर प्रतिक्रियेतचा संभव जितका बळकट असतो, तितक्याच बळकटपणे दिसत आहे!

***

## कुजत पडलेली शस्त्रास्त्रे

बंगालमध्ये गेल्या महिन्यात आणखी काही क्रांतीकारक युवकांना पकडून त्यांना त्यांच्यापाशी सापडलेल्या अनेक भयंकर बाँब आणि पिस्तुले अत्यादि हत्यारे बाळगण्यासाठी मोठमोठ्या शिक्षा ठोठावण्यात आल्या. बंगालमध्ये जेव्हा पाहावे तेव्हा क्रांतिकारक शस्त्रास्त्रे बाळगूनच काय ते असतात. हजारो रुपयांचा चुराडा करून आणि वाटेल त्या संकटास तोंड देउन बिचारे बाँब आणि पिस्तुले आणि हजारो गोळ्या जमवितात आणि पोलिस येईपर्यंत वर्षांनुवर्ष त्या शस्त्रागारास प्राणापलीकडे रक्षून, पोलिस येताच सरकारच्या हातात ती सर्व शस्त्रे आयतीच सोपवून देतात. खरे पाहिले असता, अशा प्रकारच्या नुसत्या शस्त्रे बाळगीत बसणाऱ्या क्रांतिकारकांना सरकारने उलट पारितोषिके देऊन त्यांच्या ह्या धंद्यास उत्तेजन द्यावयास पाहिजे! कारण सरकारास कवडीचाही व्यय न करिता फुकट शस्त्रे आणि बाँब आयते पुरविण्याचा ह्या क्रांतिकारांनी जो हा उपक्रम चालविला आहे, तो सरकारास सर्वस्वी लाभकारक आहे. शस्त्रे पुरविण्यास सरकार जे इतर अडते ठेविते त्यांना अडतीचे पैसे आणि शस्त्रांचे मूल्य असा दुहेरी खर्च द्यावा लागतो. ह्या

क्रांतिकारकांची साचविलेली शस्त्रे वेळ येताच फुकट फाकट सरकारास उचलून नेता येतातच; पण त्यास त्यांच्या अपार परिश्रमांची अडत म्हणूनही कवडीचे प्रतिमोलही द्यावे लागत नाही! म्हणून सरकारास आमची साग्रह विनंती आहे की, शस्त्रे आणि भयंकर बाँब नुसते जमवीत राहण्याचाच छंद असणाऱ्या ह्या क्रांतिकारकांना सरकारने शिक्षाबिक्षा देऊन असा उपयुक्त धंदा बुडविण्याची चुकी करू नये!

हां; जर का शस्त्र वा बाँब हाती येताच त्याचा होईल तो उपयोग करून टाकण्याची प्रवृत्ति ह्या क्रांतिकारकांत असती, तर मात्र त्यांस भयंकर दंड देणे प्राप्तच होते. मागे अशी प्रवृत्ति ह्या वर्गात असे अन त्यायोगे पिस्तुल हाती पडताच गोळीची देखील वाट न पाहता ते तेवढेच उडवून टाकीत! निष्कारण गंज खात शस्त्रे आणि बाँब साचवून ठेवून पोलिसांची मार्गप्रतिक्षा करीत ते बसत नव्हते. तेव्हा तशा भयंकर क्रांतिकारकांस भयंकर शिक्षा ठोठवाव्या लागल्या ते ठीकच झाले. पण नुसती शस्त्रे बाळगून ती पोलिसांच्या हाती निर्विघ्नपणे सोपविणाऱ्या ह्या क्रांतिकारकांची सरकारने द्वेषापेक्षा कीवच अधिक करावी आणि सरकारने फुकटची शस्त्रे मिळवून देणाऱ्या ह्या संस्थेस प्रोत्साहन द्यावे.

***

## नादानांची क्षमाशीलता

असे ऐकण्यात येत आहे की, अध्यापक इंद्र महाशय, त्यांच्या पित्याची,श्री. श्रद्धानंदांची, हत्या करणाऱ्या अब्दुल रशीदला क्षमा करावी म्हणून सरकारकडे आवेदन धाडणार आहेत! उत्तम! आता स्वामीजींच्या ह्या एका पुत्राने जो हा उदारपणा अवलंबिला त्यांचे अनुकरण त्यांच्या द्वितीय पुत्रानेही करावे आणि सरकारास दुसरे आवेदन करावे की, इंद्र महाशयांच्या विनंतीप्रमाणे अब्दुलला दया दाखवून सोडून देण्यात येताच एक बंगला आणि दहा-पाच हजार एकर भूमि पुरस्कार म्हणून देण्यात यावी! म्हणजे आपल्या दोन्ही सुपुत्रांनी हिंदू धर्माची लाज राखून पृथ्वीराजाची परंपरा बुडू दिली नाही हे पाहून स्वामीजींचा आत्मा संतोष पावेल आणि अब्दुल रशीदला फाशीची क्षमा व्हावी म्हणून प्रार्थना केली असता हिंदु उदारपणाने द्रवून मुसलमान जी एकी दोन हजार शतकांनी करणार आहेत ती एकी उलट त्यास एक जहागीर हिंदु लोकांनी दिली हे ऐकताच आणखी पाच-सहा शतकांच्या आतच करू शकतील. जहागीरच काय, पण हिंदु महासभेने कोणा एखाद्या रजपूत राजाची राजकन्याही अब्दुल रशीदला सुटून परत घरी येताच त्यास मधुपर्क म्हणून अपर्ण करावी म्हणजे आपल्या हिंदुच्या अहिंसक क्षमाशीलतेचा बाणा आपण योग्य रीतीने राखला असे होईल. मागे शहाजहानासही आपल्या पूर्वजांनी ह्याच बाण्यासाठी अशी एक रजपूत राजकन्या अपर्ण केलीच होती आणि शेवटी तिच्याच पोटी औरंगजेब जन्माला आला!!!

खरोखरच अब्दुल रशीदला सध्याच फासावर लटकवणे हे निष्ठुरपणाचे आहे आणि कोणाही हिंदु रक्ताच्या मनुष्याने आपल्या दयाशीलतेच्या ब्रीदास कलंक लावून तशा निष्ठुरपणाचा भागीदार हऊ नये अशी आमची विनंती आहे. बिचारा अब्दुल रशीद स्वर्गप्राप्तीसाठी किती आतुर झालेला! श्रद्धानंदांस ठार करून स्वर्गाची तो एक पायरी चढला आहे. परंतु अजून त्याच्या स्वतःच कथन

केल्याप्रमाणे स्वर्गाकडे नेणाऱ्या लालाजी आणि मालवीयजी ह्यांच्या मस्तकांच्या उरलेल्या दोन पायऱ्या त्या अजून चढावयाच्या आहेत. तेव्हा त्याचे ते अवतारकृत्य पूरे होण्यापुरता आयुष्यकाळ त्याला लाभावा हे कोणीही परोपकारी हिंदु मनापासून इच्छिल्याविना राहणार नाही. तेव्हा पहिल्या पायरीवरूनच ढकलीत नेऊन त्यास फासावर लटकविण्याचे पाप अध्यापक इंद्र ह्यांनी करण्यास प्रवृत्त होऊ नये! त्यांनी श्रद्धानंदांस डसलेल्या सापास दूध पाजावेच. नाहीतर इतर हिंदुंस कोण डसेल? सनातनी लोक सापास पुजतात. मग आर्यसमाजी मनुष्यानेही दया का दाखवू नये! आपण हिंदु इथून तिथून पृथ्वीराजाच्या माळेचे मणी असलो पाहिजे!!!

त्याविरहित स्वतःच्या पित्यास मारणाऱ्या आततायासही मी क्षमा करितो, असे म्हणू इच्छिणाऱ्या श्रद्धानंदाच्या पुत्राच्या भाग्याचा आणि थोरपणाचा पंडित मालीवीयजींच्या पुत्रास मत्सर वाटणे साहजिकच आहे तेव्हा त्याच्या समाधानासाठीही अब्दुल रशीदला काही दिवस जिवंत ठेवणे अष्टच आहे. म्हणजे तो श्रद्धानंदांच्या पुत्राप्रमाणे जेव्हा मालवीयांच्या आणि आणखी कोण्या हिंदूच्या पुत्रास पितृहीन करील तेव्हा त्यांना, त्यांनाही 'दया करा' म्हणून आवेदन करिता येईल आणि या हिंदु राष्ट्रात आपल्या पित्याच्या हत्याऱ्यासही जीवदान देणारे उदार पुरूष एकटे इंद्रच नाहीत, असे सगर्व सांगण्याचे भाग्य उभ्या हिंदु राष्ट्रासही लाभेल!!!

- १८ एप्रिल १९२७

***

## (३)

# शहाबादच्या मुसलमानांची हिंदु होण्याची धमकी

शहाबादच्या एका मुसलमानाने ख्वाजा हसन निजामीला एक पत्र लिहिले आहे की, मी एका सावकाराचे एक हजार रुपये देणे लागत आहे; आपण मला तेवढे देत असाल तर बरे, नाही तर मी शुद्ध होऊन हिंदू होउन जाईन! ह्या उदाहरणावरून तरी आमचे मुसलमानबंधु शुद्धि चळवळीवर जळफळण्याचे सोडून उलट तिला आशिर्वाद देऊ लागतील अशी आशा आहे. कारण निर्धन मुसलमानांना शुद्धीच्या चळवळीने एक नवीन धंदा मिळवून दिला; सावकाराचे ऋण फेडण्याचे एक नवे साधन करून दिले. शुद्धि चळवळ नव्हती आणि हिंदू होणे अशक्य होते तेव्हा मुसमानीपणात इतका राम नव्हता. एकदा एखादा मुसलमान झाला की, त्याला कवडीचे मोल नसे. पण ‘नाही तर हिंदु होतो’ असे म्हणणे शुद्धि चळवळीने शक्य केल्यापासून मुसलमानीपणात थोडा राम शिरू लागला आहे. त्याला थोडे मोल येऊ लागले आहे. ज्या कोणा इस्लामच्या भक्ताला घरादारावाचून पैसे काढण्याची आवश्यकता वाटेल, त्याने शुद्धिचे तारण लावून दिले की, त्यावर हजारो रुपये त्याला ख्वाजा हसन निजामीचे पेढीवर मिळू शकतील. नुसते म्हटले की, ”नाही तर मी हिंदु होतो!“ की पटलीच हुंडी!

***

मौलवी जाफरअल्ली ‘रंगीला रसूल’ विषयी म्हणतात की, जर आज मुसलमानी साम्राज्य असते तर त्या लेखकास ते शंभर पानांचे पुस्तक लिहिण्यासाठी दगडफेकीने, संगसार, ठार करून टाकण्याचीच शिक्षा झाली असती! अगदी खरे; मिय्याजी, मुसलमानी साम्राज्याच्या ह्या पुण्याईमुळे तर भाउंच्या घणाखाली त्या साम्राज्याचे सिंहासन चूर्ण झाले! जर मुसलमानी साम्राज्य असते तर! - जर आत्याबाईला मिशा असत्या तर! -’रंगीला रसूल’च्या कर्त्यास ठार मारण्यात आले असते; असे मौलवी जाफरअल्लीस असे विधान केल्याविषयी एका उंदराच्या पिंजऱ्यात बंद करून टाकण्यात आले असते असे आम्ही म्हणतो! हो, वचने की दरिद्रता!

***

मुसलमान बंधु आज पन्नास वर्षे आम्हांस ‘विशिष्ट प्रतिनिधित्व द्या’ म्हणून सारखी ओरड करीत आहेत. विधिमंडळात विशिष्ट प्रतिनिधित्व **(special representation)** त्यांस मिळून हिंदुहून त्यांचे अधिक प्रतिनिधी प्रतिशेकडा निवडण्यात येतात, नोकऱ्यांतूनही त्यांना शेकडो अधिक

जागा राखून ठेवण्यास सुरवात होत आहे. कलकत्ता नगरसंस्थेतही हिंदूहून अधिक प्रतिनिधित्व मुसलमानांस प्रतिशेकडा मिळत आहे. तथापी एका गोष्टीत मात्र हिंदूनी मुसमानांस विशिष्ट प्रतिनिधित्व देण्याची आजवर फारच टाळाटाळ चालविली होती; ती गोष्ट म्हणजे दंग्याची.

कारण जितके दंगे गेल्या वर्षापर्यत झाले त्या सर्वात मेलेल्या अन घायाळांच्या संख्येत हिंदुच आपली भर करून घेत. त्या सर्व जागांवर हिंदुच हिंदु नेमिले जात. मेलेल्यांत किंवा घायाळांत शेकडो एक जागा देखील मुसलमानांस राखून ठेवण्यात येत नसे. हा हिंदूचा आप्पलपोटेपणा अक्षम्य होता.

ऐहिक सुखाच्या-विधिमंडळ, नोकऱ्या, नगरसंस्था इत्यादी जागांवर जर मुसलमानांस विशिष्ट प्रतिनिधित्व मिळणे न्यायाचे आहे, तर अर्थात त्याच भौतिक सुखात उच्च असे जे स्वर्गीय सुख जे ज्या दंग्यात मरून किंवा घायाळ होऊन धर्मवीरांस मिळायचे, त्या दंग्याच्या प्रसंगी मुसलमानांतील कोणासही धर्मवीर म्हणवून घेण्याची संधी हिंदू मिळू देत नसत. हा त्यांचा आप्पलपोटेपणा अत्यंत निंदनीय होता ह्यात शंका नाही. गेल्या वर्षापर्यंत जो दंगा पहावा त्यात मेलेले किंवा घायाळ आपले सगळे हिंदुच हिंदु! दंग्यात अल्लाचे नावांने मरून वा घायाळ होउन 'शहीद' धर्मवीर होण्याची संधि मिळून स्वर्गात जाता येईल इतका चोप एकाही मुसलमानास हे आप्पलपोटे हिंदु मुळीच देत नसत इतर सर्व गोष्टींत मुसलमानाबंधूंस विशिष्ट प्रतिनिधित्व आणि शेकडा अधिक जागा देत असताही पारलौकिक सुखासारख्या महत्वाच्या प्रकरणी हिंदुनी प्रत्येक दंग्यात मेलेल्यांच्या आणि घायाळांच्या जागेवर आपलीच नेमणूक करून घ्यावी ही गोष्ट त्यच्या औदार्याच्या लौकिकास साजेशी नव्हती.

मुसलमान बांधवास दंग्यातील प्रसादही विशिष्ट प्रतिनिधित्वाचे तत्वावर अधिक वाटणे तर राहोच; पण बरोबरीनेही न वाटण्याच्या हिंदूच्या ह्या कृपणतेमुळेच मुसलमानबंधू त्यांच्याशी एकी करावयास मागे घेत. असा पंक्तिप्रपंच त्यांनी तरी काय म्हणून, किती दिवस सहन करावा? दंग्याचा प्रसाद सर्व स्वतःच खाऊन टाकणे हा हिंदूचा पक्षपातच हिंदुमुसलमानांच्या एकीकरणास अशक्य करीत होता ह्या म्हणण्यात इतर सर्व म्हणण्यांहून अधिक तथ्य होते हे उघड आहे.

पण, सुदैवाची गोष्ट की, कलकत्त्याच्या दंग्यापासून हिंदूनी हा आप्पापोटेपणा सोडण्यास हळूहळू प्रारंभ करून ह्या वर्षी तर मुसलमान बांधवांस बहूतेक दंग्यात लोखंडी चण्यांचा बराचसा प्रसाद स्वहस्ते वाटण्यास मागे पुढे पाहिले नाही, उदाहरणार्थ, बरेलीचा दंगा घेऊ, गेल्या महिन्यात दीड महिन्यात जे महत्वाचे दंगे झाले; त्यात बरेलीचा दंगा मोडतो. त्या दंग्याचे वेळी घायाळ झालेल्या 'अर्ध धर्मवीरांचे' अधिकार आणि पदव्या सर्वस्वी हिंदूनीच न उपटता आपले हातांनी जवळजवळ शेकडा पन्नास ह्या प्रमाणात आपल्या मुसलमान बांधवासही अर्पण केल्या आहेत. हिंदू घायाळ ५४ आहेत तर मुसलमान ४३ आहेत. हिंदूनी घायाळपणात जर थोडा पंक्तिप्रपंच करून स्वतःच्या पोळीवर थोडे अधिक तूप ओढिले असेल, तर 'मेलेपणा' पूर्ण धर्मवीरत्वाच्या स्वर्गीय अधिकारात अधिक उदारपणा दाखवून ती उणीव भरून काढली आहे. कारण दंग्यात मरून स्वर्गातील ज्या अधिकारांच्या जागा पटकवावयच्या, त्यांपैकी हिंदूनी ६ आपलकडे ठेवून मुसलमानांना ७ जागा दिल्या आहेत! दे.दासांनी केलेल्या शेकडा ५० जागंच्या कराराहूनही १ जागा मुसलमानांस अधिक देऊन टाकली.

बरेलीस हिंदू ६ मेले आणि मुसलमान ७, कानपूरच्या हिंदूनीही तितका उदारपणा दाखविला नसला तरी आप्पलपोटेपणा काही केला नाही. कारण घायाळांत हिंदूनी १०५ लोक आपले भरती केले तर ८१ मुसलमांनाचे भरती करून, राष्ट्रीय सभेने मुसलमानांस जे शेकडा तीस विशिष्ट प्रतिनिधित्व अपर्ण केले आहे, तो करार पाळला. स्वर्गसुखाच्या वाटणीत तर मुसलमानांस अगदी दासांच्या करारा‍प्रमाणे शेकडा ५० जागा राखून ठेवून एक हिंदू स्वर्गाच्या शिडीवर चढताच एका मुसलमानासही त्याच्याच मागच्या पायरीवर चढवून देण्यात आले.

पण नागपूरला तर हिंदूनी उदारपणात काडीचाही कसून ठेवला नाही. मुसलमान नोकऱ्यांतून विधिमंडळातून, नगरसंस्थेतून कुठेही मागत नाहीत असे भरपूर-स्पेशल रिप्रिझेंटेशन-विशिष्ट अधिकार त्यांस अर्पण केले. शेकड्यामागे हिंदूच्या बरोबरीनेच नव्हे तर अधिक अधिकाराच्या राखीव जागा त्यांच्यासाठी ठेवून, घायाळपणाचे किंवा मेलेपणाचे - म्हणजेच अर्ध धर्मवीरत्वाचे किंवा पूर्ण धर्मवीरत्वाचे स्वर्गीय अधिकारंत त्यांस हिंदूहून कितीतरी अधिक भाग देऊन टाकला. कारण हिंदू ४७ घायाळ झाले तर मुसलमान ७७ आणि स्वर्गाकडे १० हिंदु धाडण्यात आले, तर १४ मुसलमान बंधु धाडण्यात आले.

-दि. ६ ऑक्टोंबर १९२७

***

## (४)

# हिंदूनी मशिदीवरून वाजवावे

# महूच्या मुसलमानांचा बनाव

आम्हांस कळविण्यात दुःख वाटते की, वाद्यरोगाने पछाडलेल्या आमच्या मुसलमान देशबंधूस जी वार्ता ऐकताच अगदी तीव्र वेदना होतील, अशी एक बातमी सागण्याचे आमच्या दैवी आज यावे! हिंदूमुसलमानांत दंगेधोपे चालण्यावर ज्यांचा चरितार्थ चाललेला आहे, अशा अनेक मौलवीमौलानांस ती बातमी खरी असताही खरी वाटणार नाही अशी ती बातमी ही की, झाशीकडील महू नावाच्या गांवी हिंदूमसलमानांची एक मोठी सभा होऊन, त्यांच्यापुरता त्यांनी वरील वाद्यांचा प्रश्न सामोपचाराने सोडवून टाकिला आणि तो कशा प्रकारे? तर मुसलमानांनी मान्य केले की, हिंदूनी केव्हाही मशिदीवरून मिरवणूक चालली असता वाद्ये वाजवावीत! त्यांस मुसलमानांची काहीएक हरकत होणार नाही!!

हा निर्णय होताच दुसऱ्या दिवशी तो तोंडी निर्णय लेखबद्ध करण्याकरिता उभय पक्षांची पुन्हा सभा भरली आणि खालील करारपत्र संमत होउन त्यावर उभय पक्षांच्या स्वाक्षरीही (सह्या) झाल्या. ते करारपत्र असे : ‘झाशी जिल्ह्यातील महू नगरच्या हिंदू आणि मुसलमान ह्यांच्यामध्ये असा करार झाला की, मशिदी आणि मंदिरे यांजवरून वाटेल त्या वेळी वाद्ये वाजीवत जाण्यास कोणीही कोणास प्रतिबंध करू नये. कारण की ह्या महूकडील भागात गावोगाव सर्व प्रकारच्या मिरवणूकी नाचरंग, वाद्ये इत्यादी थाटासह मंदिरावरून आणि मशिदीवरून जात आलेल्या आहेत. आणि म्हणूनच आम्ही हिंदू-मुसलमान आपसांत यापुढेही वाद्यांच्या यःकश्चिंत् प्रश्नासंबंधी तंटा करण्याचा मूर्खपणा न करिता जुन्या रूढीप्रमाणेच पुढेही वागणार. हा करार आम्ही उभयतांनी आपल्या इच्छेने आणि कोणताही विकल्प चित्तात न ठेविता केला आहे.’

ज्या वाद्यांच्या प्रश्नासाठी मौलाना महंमदअलीपासून तो पत्वाखालीच्या गावगुंडापर्यंत सर्व धर्मभिमान आणि सुशिक्षित आणि सभ्य मुसलमान आज पिढ्यानपिढ्या शेकडो हिंदूंची डोकी फोडीत आणि शेकडो मुसलमानांची डोकी फोडून घेत आलेले आहेत, त्या अत्यंत बुद्धिमान लोकांना अत्यंत बिकट वाटणाऱ्या प्रश्नास अगदी सोप्या रीतीने सोडवून ह्या महूच्या अडाणी मुसलमानांनी त्या गंभीर प्रश्नास अगदी गावठी स्वरुप दिले, ही गोष्ट मुसलमानीपणाच्या बाण्यास फारच लांच्छनास्पद आहे, ह्यात काही शंका नाही!

त्या करारपत्रातील दुसरा ठळक दोष म्हटला म्हणजे हा की, त्यामुळे ईश्वराच्या श्रवणशक्तीविषयी दाखविलेला अत्यंत अनादर हा होय. मशिदीपुढे वाद्य वाजत असली तर आमच्या प्रार्थना भंग होतात, अर्थातच ईश्वरास त्या जाव्या तशा ऐकू जात नाहीत, हा विद्वान

मौलीवमौलानांचा मूळ सिद्धांत! त्यास या करारपत्राने हरताळ फासला. कारण ह्यात असे स्पष्ट सूचित केले आहे की, वाद्ये वाजली तरीही भक्तांच्या प्रार्थना भंग पावत नाहीत आणि त्या ईश्वरास ऐकू जातातच! कोण हे अनुदार पाखंड! ईश्वर काय अंतःसाक्षी आहे की, त्यास वाद्यांच्या कोलाहलातही भक्तांच्या प्रार्थना ऐकता याव्या! आणि ज्यास वाद्यांच्या घणघणाटातही एकाग्र मनाने प्रार्थना करता येते तो भक्त तरी कसला! प्रार्थनेतील अक्षरापेक्षा हिंदूची वाद्ये वाजतात केव्हा आणि मी त्यांचे डोके फोडण्याच्या धार्मिक ढोंगाखाली लूटमार करण्यास बाहेर पडतो केव्हा, इकडेच ज्याचे सारे लक्ष वेधलेले असते तो खरा भक्त -खरा 'दिल'दार! बकी सर्व काफर-नादार! या मौलवींच्या मूळ सिद्धान्तास या महूच्या मुसलमानांनी अगदी धाब्यावर बसविले आणि हिंदूस म्हटले खुशाल वाद्ये वाजवा ज्या अल्लाला 'चिडियोंके पावमें घुंघरू बांधा वो भी अल्ला सुनता है!' मुंगीच्या पायातील घुंगराचा आवाज देखील, मुंगीच्या मनातील विचार देखील ज्या अल्ला ऐकू जातात, त्याला आमच्या प्रार्थना वाद्यंच्या घणघणाटामुळे ऐकू जाणार नाहीत, इतकी काही त्या अंतर्यामीची श्रवणशक्ती बहिर्गामी झालेली नाही!

ह्या करारातील ह्याहीपेक्षा महत्वाचा दोष म्हणजे त्यावर रक्ताचे चार थेंब देखील सांडलेले नाहीत. नुसत्या काळ्या शाईचा करार! हा शिष्टाचाराचा अक्षम्य भंग होत आहे. हिंदूनो, तुम्ही मशिदीवर वाद्ये वाजवा, मुसलमानहो, तुम्ही मंदिरांवर वाद्ये वाजवा!! - ह्या एका लहान वाक्यात आज शेकडो हत्या करून आणि नदी नदी रक्त ओतूनही जो प्रश्न शेकडो शहाण्यांस सुटला नाही तो चार अनाड्यांनी सोडविण्याचे धाष्ठर्य करावे! आणि पाच-पन्नास डोकी देखील फोडू नयेत! हे केवढे पाजीपण आहे. असे करार रक्तात लिहावयाचे अशी स्पष्ट धर्माज्ञा मौलीवीय चालू आज्ञा **(order of the day)** असता नुसत्या काळ्या शाईच्या एका वाक्यात प्रश्न मिटवून टाकिला!

हाय! हाय! आम्ही आता अज्ञानी मुसलमानांपासून निधी कसल्या कर्तव्याच्या नावाने जमवावा! खिलाफत मेली तरी वाद्यांची आफत-आपत्ती हातीशी होती. हीही जर अशी एका वाक्यात मरेल, तर मग कोणच्या तोंडाने आम्ही वर्गणी मागावी! आणि निधी नसेल, दाम नसेल तर मग खिलाफती मौलवीपणांत राम तो काय राहिला!

तरीही मौलानाजी, अगदी निराश होऊ नका. खिलाफत गेली तशी वाद्यफत गेली तरी पुनः गुंडाफत म्हणून मुसलमानी समाजात उर्वरित आहेच आहे. तिच्या साह्याने आपल्या हिंदू विद्वेषाचे बळावर तगू शकणारे मौलानापण टिकू शकेल. बंगालकडे थोडे पहा. महूच्या तारेच्या अगदी उलट तार तिकडून आली आहे! महू ते महूच - पण बंगाल्यात मुसलमान पूर्वी इतकाच कणखर आहे. ऐकलात त्यांच्या अद्वितीय असा नवा पराक्रम?

## पिशाच्च वृत्तीचा प्रभाव

नसलात तर ऐका -मुसलमानी गुंडपणास तर काय, परंतु प्रत्यक्ष पिशाच्च्यांच्या गुंडपणासही लाजविणारा तो पापी पराक्रम ऐका. लेखणीला सांगण्यासही थराकाप आणि लज्जा वाटते, पण कर्तव्यच म्हणून सांगतो : राजशाही जिल्यात भवानीपूर गावी पूजारी राजवंशी राहतात. त्यांच्यात पडदा नसतो. त्यांच्या काही स्त्रिया पुरूषांबरोबर बाजारातून परत येत असता रात्र पडली. तोच मुसलमानांच्या धर्मवीरांनी त्यांस अडवून एक तरूण स्त्री उचलून पळविली. ती गर्भवती होती.

तिच्यावर त्या पिशाच्च्यांनी पाळीपाळीने बलात्कार करण्यास आरंभ केला. हे राक्षसी क्रौर्य चालता चालता ती स्त्री बेशुद्ध झाली- रक्तबंबाळ झाली- तरी ते मुसलमानी गुंड परावृत्त होईनात. इतक्यात पुजारी पोलिसांसह धावपळ करीत तेथे आले. तो हे पराक्रमी धर्मवीर पळून गेलेले दिसले, ती स्त्री रक्तात लोळत पडलेली दिसली - आणि हाय हाय! तो तिचा गर्भ तडफडत बाहेर पतन पावनू चेंदामेंदा झालेला दिसला! त्या अधमांपैकी एकास पकडले असून दावा चालला आहे!

ज्या 'स्वतंत्र' पत्रात ही बातमी दिली आहे त्याच पत्रात लगेच दुसरीही बातमी प्रसिद्ध झाली आहे. की, फॉवर्ड' म्हणते की, प्रियसुंदरी नामक हिंदु स्त्रीच्या खटल्याचा कोर्टात निकाल होऊन त्यातील अपराध्यांस सात-सात वर्ष सश्रम कारावासाचा दंड मिळाला आहे! हे अपराधी अर्थातच मुसलमानी धर्मवीर होते हे निराळे सांगणे नकोच. २४ सप्टेंबरला रात्री कुरबान आणि लतिफ, या दोघा मुसलमानांनी प्रियसुंदरीच्या घरात घुसून इतर मुसलमानांच्या धर्मबंधुत्वाच्या पवित्र साहाय्याने तिला एका भाताच्या शेतात उचलून नेले त्या पाजी पशूंनी तिच्या सतीत्वावर घाला घातला. ती मरणोन्मुख होउन रक्त स्त्रावात न्हालेली तशीच तडफडत पडली असता रमाकांत हवालदाराने तिला पाहिले. पोलिसांना बातमी कळताच त्यांनी दोघा आरोपींना पकडले. पण ती साध्वी अबला अट्ठाविसावे दिवशी रूग्णालयात मेली. डॉक्टरने ती निर्दोष अबला भीषण बलात्काराने मेली म्हणून प्रमाणपत्र दिले. तिच्या लहानग्या मुलाने सांगितले की, मला सुरा दाखवून माझ्या आईला ह्यांनी ओढून नेली! आपली ओळख पटू नये म्हणून त्या लतिफ आणि कुरबान यांनी आपली दाढीमिशी मुंडून टाकिली होती. न्यायाधीशांनी त्यांस सात वर्षांची शिक्षा दिली.

यावर काय लिहावे! ज्या संस्कृतीत हे असे शेकडो लोक जन्मास येतात किंवा नांदू शकतात किंवा संव्यवहार्य समजले जातात -नव्हे काही प्रत्यक्ष पुराव्यावरून असेही म्हणता येते की, हिंदूच्या अनाथ अबलांना पळवून नेणारांची पाठही थोपटण्यात येते. त्या संस्कृतीचा त्रिवार धिक्कार असो. तिच्या सुधारणेचा एकच मार्ग आहे म्हणजे तिचा आमूलाग्र नायनाट करणे हाच होय. दंडविधान **(Criminal Law)** पुरे पडत नसेल तर प्रत्यक्ष राजदंड हाती घेऊन तो नायनाट केला पाहिजे!

ह्या पैशाचिक प्लेगाची मुसलमान समाजात सध्या साथच आलेली आहे की काय अशी भीती वाटावी, इतक्या भीषण अनुक्रमाने प्रत्यही राक्षसी वृत्तीचे अत्याचारी स्त्रिपुरूष शेकड्यांनी उत्पन्न होत आहेत. स्त्रियादेखील! उदाहरणार्थ ही खालची फ्री प्रेसची बातमी पहा. २४ सप्टेंबरला बदलापटिया नावांच्या ठाण्यातील कुमारबिल नावाच्या ठिकाणी एका मुसलमान बाईने आपल्या नवऱ्यासाठी मांसाचे भोजन करून ठेविले. पण नवरा परत येण्याचे आधी ते कुत्र्याने खाऊन टाकिले. तेव्हा एका खड्याने दोन्ही पक्षी मारावे अशा हेतूने तिने, दुसरे कशाचे मांस नाही आणि तिचा सावत्र मुलगाही नाहीसा करण्याचे अजून उरलेले आहे असे पाहून त्या लहान मुलाला कापून त्याचे मांस शिजविले आणि ते आपल्या नवऱ्याला न सांगता मुलाचे मांस बापास जेवू घातले! असा सावत्र मुलाचा सूड उगविला! ती स्त्री सध्या अटकेत आहे. अशा पैशाचिक स्त्रिया जेथे आहेत त्या घरात त्यांचे पोटी वर वर्णिलेल्या नीचातील नीच 'धर्मवीरांची' वीणच उत्पन्न व्हावयाची!

एकदा पिशाच्चवृत्तीसच धर्मकर्तव्य समजण्यात आले म्हणजे मग बापास बाप आणि मुलास मूल म्हणण्याइतकी माणुसकी मनुष्यात उरत नाही. कुत्रे पिसाळले म्हणजे प्रथम दुसऱ्यास

चावावयास धावते, व रक्त जो जो तोंडी लागते तो तो ते अधिकच पिसाळते आणि शेवटी दुसऱ्यास चावता चावता स्वतःसही चावू लागते. तसाच धर्मोन्मत पिसाट, 'काफर' म्हणून दुसऱ्यांचे रक्त पिण्यास चटावता चटावता शेवटी रक्ततृष्णा अनिवार होऊन स्वतःच्या घरातही रक्तपात करीत सुटतो. हा इतिहासाचा अनुभव आहे. सरसीमेवर हिंदूंस काफर म्हणून भयंकर रीतीने छळून मारून लुटून हुसकून दिले. कारण ते अत्यल्प होते. पण ते गेल्यावर त्यांच्या रक्ताने पिसाळलेल्या धर्मोन्माद स्वतःच्या घराकडे वळताच आपल्या अंगासच फाडफाडून टाकू लागला. हिंदू काफर होते- पण मुसलमानात तरी सर्व मुसलमान कोठे धर्मनिष्ठ- इमानदार होते! ते शिया पहा. सुनीच्या धर्ममताप्रमाणे तेही जवळ जवळ काफरच होते. हिंदू अत्यल्प होते तर ते शियाही अल्पच आहेत. ठीक तर मग, ह्यांना आपला प्रांत जर निर्भेळ धर्मनिष्ठ मुसलमानांचाच देश करावयाचा असेल तर, जी हिंदूंची गत तीच शीयांची नको का करावयास! असा विचार करून सरसीमेवरील पिसाळलेल्या सुन्नी बहूसंख्याकांनी शियांवरही धर्मयुद्ध पुकारले. हिंदूंच्या रक्तस पिण्यासाठी शीया व सुन्नी अशा दोन्ही मुसलमानांच्या सुऱ्या चटावलेल्या होत्या. त्याच आता हिंदूंचे रक्त संपताच एकमेकांचे रक्त पिऊ लागल्या. सुन्नी मुसलमानांनी शीया मुसलमांनासही 'अर्ध काफर' म्हणून हाणून, मारून, कापून काढीत ते अल्पसंख्यांक असल्याने त्यांस हुसकून दिले! शिया मुसलमानांनी हिंदूंवर जे अत्याचार ज्या कारणासाठी हसत केले; तेच अत्याचार त्याच कारणासाठी त्यांस रडत भोगावे लागले.

हिंदूंना मारून लुटून हुसकून दिले. तेव्हा सरसीमेवरील मुसलमानांच्या ह्या राक्षसी कृत्याबद्दल शिया मुसलमानांनी दुःखाचा एक शब्दही काढला नव्हता. पण हिंदूंच्या मागोमाग शियांवरही तोच प्रसंग गुजरताच आता शिया मुसलमान मोठ्यामोठ्या सभा करून ओरडत आहेत. 'अत्याचार! सरकार, रक्षण करा! हे सुन्नी आमचा नायनाट करीत आहेत! हे सुन्नी राक्षस आहेत!' खानबहादुर सर सय्यद अस्माईल यांनी देखील सुन्नींच्या ह्या धर्मोन्मत क्रौर्याची निंदा केली!

पण हिंदूंना ह्याच धर्मोन्मत क्रौर्याची सुरी जेव्हा भोसकीत होती, तेव्हा ह्याच शियांस ती देवदूताची तलवार वाटत होती! बाबांनो, द्यावे तसे घ्यावे, पेरावे तसे भरावे. धार्मिक मतभेद होताच 'कत्तल करा' हे भयंकर राक्षसी मत जोवर तुम्ही उराशी धरीत आहा, तोवर मुसलमानहो, तुम्ही हिंदूचेच नव्हे तर स्वतःचेही शत्रू आहात. कारण हिंदू मूर्तिपूजा करितात म्हणून त्यांना ठार मारणार, तर शिया अल्लीनंतरच्या खलिफांस मानीत नाहीत, अल्लीसही पैगंबराइतकेच पूज्य मानितात म्हणून तेही काफरच ठरून मारिले जाणार. जिथे शिया सबळ तेथे सुन्नी, अल्लींची कत्तल करणारे कुलांगर म्हणून मारिले जाणार. शिया मारिले गेले की सुन्नी-सुन्नीतही कत्तल होणार. झाल्या आहेत. होत आहेत. कारण त्यांच्यातही शेकडो धर्मपंथ आणि मतांतरे आहेत. आणि मत भिन्न की, "मारो बदमाश को" म्हणून धर्माज्ञा आहे! निदान अशी हजारो मुसलमानांची समज तरी आहे.

तीच खोजांची पाळी येणार! कारण मुसलमानांतील शिया आणि सुनी हे दोन्ही पंथही खोजांस इतक्या तीव्र वैमष्याने लेखतात की, खोजांस मुसलमानांच्या मशिदीत नमाज पढण्याचीही बहूधा बंदी असते. मुसलमानांच्या आणि खोजच्या धर्ममतांत तसाच मतभेद आहे. मनुष्यात ईश्वरांश असतो, ह्या अवतारवादाच्या मुळाशी असलेल्या तत्वाशी मुसलमानांस भयंकर चीड, पण खोजांचे

मूळ धार्मिक तत्वच हे की, आगाखानच्या वंशात ईश्वरी अंश वसत असून आगाखानाच्या वंशालाच ईश्वर विभूती म्हणून पूजा आणि भक्ति करणे हे प्रत्येक खोजांचे धर्मकर्तव्य आहे! सध्याच खोजांच्या समाजात सुधारणेची एक चळवळ उत्पन्न झालेली असून तिच्या पुरस्कर्त्यांनी एक अनावृत्त पत्र आगाखान यांस उद्देशून लिहिले आहे. त्याच्या प्रती सर्वत्र वाटण्यातही आलेल्या आहेत. त्या पत्रात तर असे स्पष्ट विधान केलेले आहे की, स्वतः आगाखान ह्यांनी म्हटले आहे की, प्रस्तुतचे कुराणात प्रक्षिप्त भाग पुष्कळच आहे. मुसलमान म्हणणार महंमद शेवटचा पैगंबर. खोजे म्हणतात आगाखानंचे मूळ पुरूष हेही पैगंबर आणि आगाखानांनी स्वतः म्हटले आहे की, अप्रकट असलेले खरे कुराण लिहिण्यास मला सहा महिने तरी लागतील. आगाखानांची ही वाक्ये त्यांच्याच अनुयायांनी प्रसिद्ध केलेली असल्याने आणि कुराणाची मूळ प्रत कोणती हा वाद, महंमद महाशयांच्या मृत्यूपासूनच मुसलमानांत पंथ विपंथ पाडण्यास कारणीभूत झालेला असल्याने खोजा समाजाच्या ह्या मताविषयी मुसलमांनात किती तिटकारा येत असेल हे निराळे सांगणे नकोच. प्रस्तुत अनावृत्त पत्रात आगाखानांवर लाखो रुपये भोळ्या भाबड्या लोकांकडून गोळा करून आणि बष्किाराच्या धाकाने उकळून विलायतेत स्वतःच्या विलासार्थ उधळले जातात याविषयी पुष्कळ कडक टीका करण्यात आली आहे. स्वतःच्या अनुयायांच्या टीकांनीच जे धर्मगुरू असे ‘कलंकित’ झालेले आहेत, तेच भोळ्या हिंदूंस बाटविण्यासाठी ‘निष्कलंकी’ कलंकीचा अवतार म्हणून मिरवू पहातात हे आश्चर्य आहे.

-दि. ३ नोव्हेंबर १९२७

# (५)

# धमकीची पत्रे

श्रीयुत राजपाल, स्वामी सत्यानंद, लाला नानकचंद ह्या गृहस्थांच्या हत्या करण्याच्या पवित्र प्रयत्नास अपराध समजून काही मुसलमानांस फाशीच्या शिक्षा ज्या ऑजिल्व्हे साहेबांनी दिल्या, त्यांचेवरही मुसलमानी धर्मभक्तांचा रोष झालेला आहे. त्यापैकी कोणा सात्त्विक साधू पुरूषाने मि. ऑजिल्व्हे साहेबासही एक पत्र टाकून तुम्हांसही इस्लामचा शत्रू म्हणून मानण्यात येणार आहे, असे कळविण्याची कृपा केली आहे. मि. ऑजिल्व्हेसाहेब ह्या पत्राच्या धाकामुळे हिंदुस्थान सोडून येत्या बोटीनेच विलायतेस पळून जातील, ह्यात काहीच शंका नाही!

पण मग हे इस्लामी धर्मवीर नुसत्या ऑजिल्व्हे साहेबावरच अशी कृपा करून का थांबतात? अब्दुल रशीदला फाशी देणारे साहेब आणि प्रीव्ही कौन्सिलमध्ये त्यांचे अपील अमान्य करणारे साहेबांचे टोळकेचे टोळके तर अजून जिवंतच आहे! त्यासही ताबडतोब मृत्यूची वारंटे धाडून देण्यात आली पाहिजेत. म्हणजे तेही भयभीत होऊन आपआपली कामे सोडून देतील. आणि दुसऱ्या अब्दुल रशीदला आणखी कोण्या श्रद्धानंदाची हत्या केल्यानंतर वेड्याचे ढोंग करण्याची आणि फाशीच्या आधी भयाचा ताप भरून थरथर कापत रडण्याची पाळी येणार नाही!

तळेगांवला दोघा मुसलमानी सज्जनांस हिंदूच्या देवाच्या मूर्ति फोडण्याचे पवित्र कार्य केल्यासाठी काही पारितोषिक देण्यास हवे होते. कारण मूर्तीभंजन हे इस्लामचे ब्रीद आहे असे मौलवीमुल्ला म्हणत असतात. पण तेथच्या एका दुष्ट मॅजिस्ट्रेटने त्या सज्जनांस दोन-दोन महिन्यांची कठोर कारावासाची शिक्षा दिली!- ह्या दुष्ट मॅजिस्ट्रेटलाही ऑजिल्व्हे साहेबांप्रमाणे धमकी पत्र रितीप्रमाणे धाडण्यात यावे, म्हणजे तोही पळून जाईल.

माशीपूर ग्रामच्या एम्.ई. शाळेतील एक १२ वर्षाच्या विद्यार्थी नरेंद्रनाथ ह्याला इकबर आणि त्याचा साथी ह्या दोघा इस्लामी धर्मभक्तांनी पळवून नेले होते. त्याला बलात्काराने मुसलमान करून टाकण्याचा त्यांचा प्रयत्न असून त्यांजवर खटला भरण्यात आला आहे. ज्या मॅजिस्ट्रेटपुढे हा खटला चालला आहे; त्यालाही त्वरीत मृत्यूचे वारंट धाडून बजाविण्यात यावे म्हणजे तोही जागा सोडून पळून तरी जाईल; नाही तर, त्या सज्जन आणि काफरास बळाने बाटविण्याचे पुण्यकृत्य करणाऱ्या इस्लामी धर्मभक्तांस भयभीत होऊन सोडून तरी देईल. त्यास धाडल्या जाणाऱ्या धमकीच्या चिठ्ठीत असेही लिहिले जावे की, त्या मुलास बाटविण्याचे इस्लामी कर्तव्य करणाऱ्या मुसलमांनास सोड, इतकेच नव्हे तर मुसलमानी धर्म, छळ होत असताही न स्वीकारणाऱ्या त्या १२ वर्षाच्या हिंदू मुलास ह्या उनाडपणाविषयी वेत मारण्याची शिक्षाही ठोठाव! नाही तर -उघडच आहे काय ते!

जुबेरखां युसुफशेट इत्यादी खुलना येथील इस्लामी सज्जनांवरही असाच एक प्रसंग ओढवला आहे. स्वर्णमयी नावाच्या हिंदू कन्येला पळवून नेण्याचा त्यांनी यत्न केला. असे हजारो मुसलमान हिंदु कन्यकांस पळवीत असतात. ही त्यांची पिढीजात वहिवाट आहे. ह्या वहिवाटीचा उपभोग जुबेरखां आदींनी घेणे त्यांचे कर्तव्य होते. पण खुलनाच्या सेशन्स कोर्टात त्यांचेवर ३६ आणि १४४

इत्यादी कलमाखाली खटला चालू असून ही इस्लामी अनुयायांची धार्मिक वहिवाट बंद पाडण्याचा प्रयत्न होत आहे. तरी त्या सेशन्स जज्जासही तात्काळ एक चिट्ठी धाडण्यात यावी म्हणजे तोही थरकाप भरून शुद्धिवर येईल आणि स्वर्णमयीला मुसलमांनांचे हाती सोपवून देऊन तिचा उद्धार करील.

लाला नानकचंदला ज्या गाझीने मारले त्याला फासावर लटकावले जाण्याची भयंकर शिक्षा झालीच. पण ज्या जागी ती हत्या झाली त्या मोची दरवाज्याच्या (लाहोर) वस्तीवर जादा पोलिस बसवून सरकारने तो व्यय तेथील मुसलमानांपासूनच वसूल करावा म्हणून आज्ञा सोडली आहे! मुसलमानांचा हा कोण छळ! हत्यांबित्यांसारखे सहज घडून जाणारे किरकोळ अपराध घडताच बिचाऱ्या हत्यारी धर्मनिष्ठंस धडाधड फाशीच्या शिक्षा देण्यात येतात. ते गाझी लोक रडले तरी त्यांच्या माना फासातून सुटत नाहीत! - ते राहोच, पण त्या जागी हत्या झाल्या त्या जागेने काय केले? पण त्या जागेवरही जादा पोलिसांचा कर! निर्धन मुसलमान 'हाय तोबा' करीत आहेत! - ह्या लाहोरच्या कमिशनरलाही एक धमकीचे पत्र टाकलेच पाहिजे. म्हणजे आता त्या भ्याडाची घाबरगुंडी उडून तो ते जादा पोलिस उठवील आणि फाशी देऊन टाकलेल्या मुसलमानांचे त्याने घेतलेले प्राणही परत देऊन टाकील!

नागपूरलाही एका गाझीचा असाच छळ चालला आहे. या गाझीचे नाव अब्दुल कादर असे आहे. हिंदूंच्या कन्यका पळवून त्यांस बलात्काराने मुसलमान करण्याचे जे महत्कार्य सध्या मुसलमानांतील अनेक साधूंनी हाती घेतले आहे त्यात ह्या गाझीचीहि गणना आहे. सखू नावाच्या एका चालत्या हिंदू स्त्रीस तुझ्या बहिणीचे घर मला माहित आहे, मी तुला तेथे पोचवितो अशी मार्गाने थाप मारून तिला अचानक आपल्याच घरी नेली. नंतर बायको तुला आत बोलावते आहे म्हणून तिला आत नेली तत्काळ तिला खोलीत बंद करून बंदूक दाखवून चूप करून टाकली. रात्री तिच्यावर बलात्कार करून, टांग्यात घालून दुसऱ्या एका ठिकाणी आपल्या मुलीच्या घरी तिला घेऊल गेला. त्यास त्याच्या दोघा मुलांनीही या पवित्र कार्यात साह्या केले! त्याच्या बायकोने आणि बहिणीनेही त्या स्त्रीवर होणाऱ्या बलात्कारास हातभार लावून तिला मुसलमान हो म्हणून स्वतः धमकावले. शेवटी एका कागदावर एका मुसलमान दरोग्याचे घरी तिच्या अंगठ्याचा ठसा घेण्यात आला- अर्थातच स्वसंतोषाने मी मुसलमान होत्ये अशा अर्थाच्या कागदावर! योगायोगाने त्या हिंदू कन्यकेच्या प्रार्थनेस ईश्वर पावून पोलिसला ती भूमिका कळली  आणि आता गझनिया पकडला गेला असून त्याच्यावर नागपूरला खटला चालू आहे! वास्तविक पाहता हिंदू स्त्रीस पळवून बलात्कार, छळ इत्यादी पवित्र कोटिक्रमांनी मुसलमान धर्माची महती पटवून बाटविणे, हे कृत्य मुसलमानी समाजात किती आदरणीय समजले जाते ते अब्दुल्लाच्या ह्या हिंदु कन्यकेला बाटविण्याच्या कामी प्रत्यक्ष त्याच्या आणि मुसलमान दरोग्याच्या मुसलमान स्त्रीने, बहिणीने, मुलांनी आणि आजूबाजूच्या मुसलमानी घरांनी साहृय दिलं ह्यावरून स्पष्ट होत आहे. पण ह्या नागपूरच्या दुष्ट सिटी मॅजिस्ट्रेटने त्या लोकांवर खटले भरावे हे केवढे काफरपण आहे! एतदर्थ ह्या मॅजिस्ट्रेटलाही मृत्यूच्या धमकीचे पत्र रीतसर धाडण्यात यावेच!

हिंदू कन्यकांस आणि अनाथ मुलांस बलात्काराने बाटविणे हे कृत्य मुसलमानी स्त्रियाही किती पवित्र आणि आदरणीय मानतात ह्याचे आणखी एक उदाहरण कटनी येथे नोव्हेंबरमध्येच घडले आहे. एका तेरा वर्षांच्या ब्राम्हण कन्यकेवर मार्गात एकाकी पाहून खिस्तू नावाच्या मुसलमानी साधू पुरूषाने झडप घातली, त्यासरशी ती पोरगी ओरडली. तत्काळ त्या साधूच्या धर्मशील पत्नीने तिचे हात धरून ओढले आणि तिच्या तोंडात बोळा कोंबून सुरा उपसला. ह्या मुसलमानी साधूच्या साध्वीने मग त्या मुलीला दूर आपल्या चुलत्याच्या घरी पोचवून लपविले. हिंदु कन्यकेस मुसलमानाने धरताच ते कृत्य पचविण्यासाठी झटणे हे प्रत्येक मुसलमानाचे कर्तव्य आहे ही भावना मुसलमानी समाजात किती खोल रूजली आहे ते त्यावरूनही व्यक्त होईल की पोलिस शोध चालू होताच त्या खिस्तूच्या चाचीने त्याच्या आईच्या हाती ती पोर लपवून ठेवण्यास दिली. ती खिस्तूची आई त्या मुलीस पळवीत असता धरली गेली! आता गाझी खिस्तू आणि गाझिणी ती त्याची बायको हवालातमध्ये बंद आहेत! एखाद्या हिंदू मुलाने एखाद्या मुसलमान पोरीस पळवून आणिली असती, तर हिंदू आई त्याची धन्यता मानण्याचे स्थली त्याच्या हाताला उलथणे तापवून डाग देती आणि त्याचे संबंधीच नव्हे तर उभे हिंदू गाव काशी रामेश्वरापर्यंत ऐकू जाईल अशी बोंब मारून उठते आणि तो हिंदु मुलगाच मुसलमान झाला असे म्हणून त्यास हुसकून देते. पण खिस्तूची आई पहा किती साध्वी आणि धर्मशील बाई ती! ते राहोच, पण ह्या गाझी-गाझिणी जोडप्यास हवालातमध्ये बंद करणाऱ्या प्रत्येक नराधमास मृत्यूचे वारंट सोडून पकडलेच पाहिजे. त्याचा पत्ता आहे ‘कटनी, पोलिस हवालात’.

आणखी एका ज्या पत्यावर धमकीचे वारंट धाडलेच पाहिजे तो हा : ‘राम-स्वरुप मोटार ड्रायव्हर, बाजार मुहल्ला कानपूर’. - कारण एका मुसलमान स्त्रीला तिच्या नवऱ्याने टाकून दिल्यानंतर कित्येक दिवसांनी रामस्वरुपाने तिला शुद्ध करून हिंदु स्त्रीप्रमाणे तिच्याशी लग्न लावण्याचे निश्चित केले अर्थात हा महान अपराध मुसलमानांच्या धर्मभीरु हृदयास असह्य दुःख देता झाला. हिंदूच्या विवाहीत स्त्रीला बंगालमध्ये यशोदा सुंदरीच्या आणि अन्य घटनात झाले तसे अगदी नांदत्या घरातून ओढून नेऊन बलात्कारून, मुसलमान करून घेणे हे असल्या मुसलमानांचे पवित्र कर्तव्यच आहे. तो त्यांचा, ते गाझी गुंड आणि मंडळ समजतात त्या अर्थी - धर्मच आहे. पण म्हणून हिंदूही मुसलमानांच्या टाकून दिलेल्या स्त्रियांना का होईना पण शुद्ध करून त्यांच्याशी लग्न लावू पहाणार की काय? काफर कुठले! अर्थातच शेकडो गाझी गुंड आणि मंडळींनी त्या रामस्वरुपाचे घरावर चढाई केली आणि मुलीला पळविणार तोच पोलिस आले! कोतवालीवर जाताच स्त्रीने सांगितले ‘मी शुद्ध होऊन हिंदू झाले आहे. रामस्वरुपावाचून परपुरूषास पाहणे हे मी पाप समजत आहे! हे कथन होताच दुष्ट इंग्रजांच्या पापी निर्बंधाप्रमाणे ती स्त्री रामस्वरुपाला देण्यात आली. एतदर्थ रामस्वरुपाच्या पत्यावरही एक धमकीची चिट्ठी धाडण्यात यावी आणि ते दुष्ट निर्बंध असलेले इंडियन पीनलकोडच जाळून टाकण्यात यावे!

बंगालच्या फेनी येथे हरचंद्रदासच्या शामनाद नामक स्त्रीला बलात्काराने लालमिया नावाच्या गाझीने पळविली होती. त्याला दोन वर्षे सक्तश्रमाची शिक्षा झाली. तेही एकवेळ क्षम्य म्हणता येईल; पण अलीपूरच्या सबडिव्हिजन मॅजिस्ट्रेटच्या समोर सहा-सात गाझींवर एका सन्देशखाली

गावच्या शशिबाला नामक विवाहित हिंदू स्त्रीने जो कहर गुजरविला आहे त्याचा वचपा गाझी गुंड आणि मंडळ ह्यांनी अगदी त्वरीत काढलाच पाहिजे. शशिबालेचा नवरा अतिशय आजारी. ती सतरा वर्षांची; घाबऱ्या घाबऱ्या औषध आणि साह्य मागण्यास शेजारीपाजरी फिरू लागली. अशा अवस्थेत तिची दया येणे साहजिकच होते. तशी तिची दया येऊन एका धर्मभीरू मुसलमानाने तिला औषधासाठी दुसऱ्याकडे नेले. त्याला दया आली तशी आणखी एकाला दया आली. होता होता दया हेच ज्यांचे ब्रीद आहे असे सहा-सात गाझी एकत्र जमले. त्यांनी त्या शशिबालेला एकान्त स्थळी ओढली आणि प्रत्येकाने तिच्यावर त्यांची मुसलमानी दया करण्यास आरंभ केला! सकाळी या अत्यंत यातनेने तळमळत अर्धमूर्च्छित अवस्थेत ती शशिबाला सडकेच्या बाजूस पडलेली होती. तिला पोलिसांने पाहिले आणि त्या दुष्ट पोलिसांनी तिच्यावर 'दया' न करता तिला मॅजिस्ट्रेटसमोर नेले आणि तिचे कथन घेऊन त्या सहा-सात गाझीचीच पकडापकडी मांडिली! न्यायालयात ती १७ वर्षांची शशिबाला रडत रडत तिचे हाल जेव्हा सांगू लागली तेव्हा प्रेक्षकातील कित्येक निर्दय नरपशु त्या मुसलमान गाझीप्रमाणे हसण्याचे सोडून दुःखाने अश्रू गाळीत होते! अर्थात् त्या शशिबालेचा कड घेऊन अश्रू गाळणाऱ्या या प्रेक्षकांस आणि त्या गाझींस पकडू पाहणाऱ्या सर्व मंडळीस, पोलिसांस, मॅजिस्ट्रेटास धडाधड धमकीची पत्रे धाडून साफ कळविले पाहिजे की, जर शशिबालेची चौकशी बंद न पाडाल आणि केवळ दया केल्याच्या अपराधासाठी सहासात मुसलमानी धर्मभक्तांस पकडापकड करण्याचे क्रौर्य करण्याचे बंद न कराल तर -सहा आठवड्याचे आत तुमच्यापैकी प्रत्येकास, गाझी गुंड आणि मंडळी आपल्या पवित्र सुऱ्याने भोसकण्याचे धर्मवीरत्व गाजविल्यावाचून राहणार नाहीत! म्हणजे उभे कलकत्ता पोलिस भिऊन जातील, टगार्ट साहेबही विलायतेस पळून जाईल!!

अर्थात् आम्ही दिलेल्या शेकडो पत्त्यांवर निरनिराळी पत्रे टाकण्यास व्यय अतोनात लागेल हे खरे आहे. त्यावाचून ठिकठिकाणी दंग्याचे अपराधाविषयी गेल्या केवळ दोन महिन्यांत दहा-बारा मुसलमानांस जन्मठेप, काळेपाणी, वीस-पंचवीस जणांस मुले पळविण्यासारख्या यःकश्चित गोष्टींसाठीही पाच-पाच, सात-सात वर्षांच्या कठोर कष्टाच्या शिक्षा आणि कित्येकांस दोन-चार वर्षांच्या बेड्या, अंधार कोठड्या, तुरूंग इत्यादी अमानुष शिक्षा देण्यात आल्या आहेत. त्या सर्वांचा सूड उगवावयाचा आहेच! तेव्हा इतक्या ठिकाणी धमकीच्या चिट्ठ्या धाडण्यास शाईचा व्ययही शेकडो रुपये करावा लागेल-पण यासही एक तोडगा आहे-

मुसलमानी सज्जनांचा हा छळ का होतो? अर्थात् इंग्रजी राज्याचे निर्बंध आपल्या गाझी गुंड मंडळीच्या मुसलमानी निर्बंधांशी जुळत नाहीत म्हणून. काफरांस बलात्काराने मुसलमान करणे हे पुण्यकृत्यही या इंग्रजी निर्बंधान्वये पाप ठरते! तेव्हा ऑजिल्व्हे साहेब किंवा प्रिव्ही कौंसिलच साहेबांचे टोळके किंवा सैनिक, पोलिस आणि अलिगडचे मॅजिस्ट्रेट इत्यादी शेकडो लोकांस धमकीची पत्रे धाडीत बसण्यापेक्षा ज्या इंग्रजी राज्याचे धनी जे जॉर्ज बादशहा, त्यांनाच एक धमकीचे पत्र टाकले की, काम होण्यासारखे आहे! गाझी गुंड आणि मंडळाचे वतीने दिल्ली, मुंबई, कलकत्त्याच्या गल्ली कुचीतील कोण्यातरी भाजीविक्या मौलानांसारख्या उत्तरदायी (जबाबदार) नागरिकाने लंडनच्या पत्त्यावर जॉर्ज महाराजांस निर्भीडपणे एक चिट्ठी धाडावीकी, तुम्ही हिंदुस्थानचे राज्य ही

चिट्ठी पोचताच एका आठवड्याचे आत सोडून तो मुकुट अफगाणिस्थानच्या अमिराचे हाती सोपवून द्यावा!

अशा एका चिट्ठीसरशी मुसलमानी सज्जनांचा सर्व छळ बंद होईल! एका-दोन आण्यांच्या तिकिटात काम! एकदा चिट्ठी पोचली की, मग जॉर्ज महारांजी काय छाती आहे की, ते ती अमान्य कतील! गाझी गुंड आणि मंडळींची धमकीची चिट्ठी आणि ती अमान्य? शंकाच नको! चिट्ठी पोचण्याचा अवकाश की, ते हिंदुस्थानचा मुकुट पार्सलने परत धाडून देतील पार्सलने!!!

दि. ९ डिसेंबर १९२७

## (६)

# हाती आलेली चार प्रमाणपत्रें

निपक्षपाती तिऱ्हाईताने तिऱ्हाईतास जर एखादे प्रशस्तिपत्र दिले, तर ते भूषणास्पद असतेच. ते साहजिकही असते. पण तर एखाद्या मुलाने एखाद्या पंडीतास, 'भले पंडीतजी?' म्हणून म्हटले, एखाद्या सुंता झालेल्याने एखाद्या मुंज होणाऱ्या मुलावर आंनदाने चार तांदूळ फेकून तो समारंभ साजरा केला, एखाद्या कर्झनने सुरेंद्रनाथांची वाहवा केली किंवा एखाद्या कुत्र्याने तुकड्यासाठी भांडणाऱ्या दुसऱ्या कुत्र्यास, 'खूप भांडलास' म्हणून त्याची पाठ आपल्या पंजाने थोपटली, किंवा डायरने जालियनवालात कत्तल झालेल्या एखाद्या मुलास पाहून अश्रू ढाळले, तर ती प्रमाणपत्रे मात्र अगदी अपूर्व होत ह्यात काही शंका नाही. अशाच प्रकारची दोन-चार अपूर्व प्रमाणपत्रे आमच्या हाती आलली आहेत, त्यापैकी काही खाली देतो.

## मुसलमानांचे हिंदूस प्रमाणपत्र

हिंदु संघटनाविषयी मालवीयांनी किंवा मुंज्यांनी गोडवे गावे ह्यात काही आश्चर्य नाही. ममत्वाने त्यांची बुद्धि अंधही झाली असल्याचा संभव आहे; पण मौलाना हजरत मोहानीही स्वतः म्हणतात की, 'संघटनाची चळवळ ठिकठिकाणी संघटित धोरणाने एकसूत्री काम चालवीत आहे. कानपूर, नागपूर, बरेली इत्यादी सर्व जागी हिंदूनीच दंगा आरंभिला. त्या सर्व जागी हिंदूनीच मुसलमानांना मारले, पिटले. हिंदू मुसलमानांपेक्षा फारच पुढे असून ते राजनितिज्ञ आणि मोठे चलाख आहेत. त्यांचा कट म्हणूनच मोठा पक्का आहे. प्रथम मुसलमांनांना ते मारतात; मागून मुसलमानही मारू लागले म्हणजे लगेच हिंदू गवगवा करून आकाशपाताळ एक करून बसतात. जेव्हा मुसलमानांशी एकीचे ढोंग करून बसतात, तेव्हा मुलमानांची सामाच्या ढालेखाली दडून हानि करतात. हिंदूवर सरकारने खटले भरले की, हिंदू वकील त्यांचे खटले फुकट चालवितात. मुसलमानांची घरे-दारे व्ययाखाली उजाड होतात. मुख्य काटा जर माझे मनात सलत असेल तर तो हा की, घरात छपून बसणारे हिंदु आज शक्तिमान होऊन बाहेर लढण्यास येतात! ते होऊन टकरा घेतात, ते एवढ्यासाठी की, त्यांच्या मनात आमची शक्ती पारखून बघावयाचे असते. हा संघटनांचा खेळ आहे.

## मुसलमानांचे मुसलमानांस प्रमाणपत्र

विपक्षाने विपक्षाची स्तुती करणे हे प्रमाणपत्र जसे अपूर्व, तसेच मित्राने मित्राची आणि गुरूने अनुयायांची निंदा करणे हे प्रमाणपत्रही तितकेच विचारार्ह आणि अपूर्व होय ह्यात शंका नाही. हिंदूनी मुसलमानांविषयी काही म्हटले, तर ते खरेच असेल असे नाही. पण मुसलमानांनी मुसलमानांविषयी जर काही म्हटले तर ते तरी मुसलमानांना पक्षपाती म्हणून सहसा म्हणवणार नाही. एतदर्थ स्वतः हसन निजमीसाहेब आपल्या 'मुनादी' पत्राच्या १४ सप्टेंबरच्या अंकात मुसलमानांस जे प्रशस्तिपत्र देते झाले आहेत, त्यातील काही उतारे शुद्धि समाचारावरून देतो. हसन निजमी म्हणतात, 'आज आम्ही मुसलमान आर्यसमाजावर जळफळतो आणि सर्व जगास मुसलमान करू म्हणतो. पण खरी वस्तुस्थिती अशी आहे की, (१) आम्ही मुसलमान केवळ नावाचे

मुसलमान आहो. (२) अल्लाने सांगितले की खोटे बोलू नका; पण आजचे मुसलमान इतर सर्वाहून खोटे बोलणारे आहेत. (३) दारू पिऊ नका म्हणून धर्माज्ञा; पण मुसलमान उघड उघड दारू पिऊन झिंगतात. (४) चोरी करू नका म्हणून धर्माज्ञा; पण बंदिशाळांतून जाऊन पहा की, अट्टल चोर तेवढे मुसलमानच अधिक. (५) धर्माज्ञा की वेश्यापण वाईट; पण बाजारात जाऊन पहा, वेश्यांमध्ये बहूतेक दुकाने मुसलमानिणींची! त्यांच्याकडे जाणाऱ्या वेश्यागामी लोकांतही अधिक संख्या मुसलमानांचीच! (६) आज सगळ्यांत आळशी आणि बाताडे आणि गावगुंड जर कोणी असतील तर ते मुसलमानच. (७) आमच्या पूर्वजांची कीर्ति कुठे! आज लोकांत म्हणच पडली आहे, कोणी मनुष्य असा क्रूर-किंवा असा दुष्ट किंवा असा पाणी आहे की, जसा मुसलमान! वाईत दुर्गुणांचे आम्ही उपमान ठरलो आहो!

(हे हसन निजमी असे म्हणत आहे-आपण नाही हो बुवा कधी मुसलमानांची इतकी अघळपघळ स्तुती करीत!)

## हसन निजामीस 'दूर्रे' उमरचे प्रमाणपत्र

वर हसन निजामीने मुसलमानांस दिलले प्रमाणपत्र दिले आहे. आता मुसलमानांच्या 'दूर्रे उमर' नावाच्या पत्राने हसन निजमीस दिलेले प्रशस्तिपत्र पहाः 'दूर्रे उमर' आपल्या एका लेखास 'पहिल्या प्रतीचा शिवराळ' म्हणून मथळा देऊन त्यात म्हणतो : हसन निजमी पहिल्या प्रतीचा शिवराळ आहे. तो आपल्या शिष्यांस आज्ञा देतो की, मला 'सिजदा' करा. 'सिजद्या'चे वेळी शिष्यांना म्हणावे लागते की, 'हे हसन निजमी एकोजन- इहलोक आणि परलोकचा तूच सरदार आहेस. तुझ्यावाचून 'सिजद्या'चा कोण अधिकारी नाही! महंमद अल्ली तर, हसननिजामीस, "उघड उघड पैसे खाऊ! सरकारचा गुप्त हेर!" म्हणून, गौरवित असतात.

## कर्मठ हिंदूंनी अस्पृश्यांस दिलेले प्रमाणपत्र

भडोच जिल्ह्यातील अंकलेश्वर गावी महारवाड्यातील महारांना पाण्याचा फार त्रास पडे. पण त्यांना सार्वजनिक पाणवठ्यावर कोणी जाऊ देईना. तेव्हा त्रासून जाऊन आणि मुसलमानांच्या फुशीने उत्तेजित होऊन त्या महारांपैकी ३० महार मुसलमान झाले. तत्काळ दुसऱ्या दिवशी कर्मठ हिंदूनी त्या महारांस मुसलमानी धर्माच्या सुंता नावाच्या संस्काराने ते शुद्ध झाले असल्यामुळे त्यांस 'स्पृश्य' झाल्याचे प्रमाणपत्र दिले! इतकेच नव्हे, 'बोले तैसा चाले' ह्या उच्च कर्मठ तत्वानुसार त्या मुसलमान होऊन शुद्ध झालेल्या महारांस त्याच सार्वजनिक पाणवठ्यावर त्याच दिवसापासून पाणी भरू देण्यास परवानगी दिली. जे महार त्या पाण्याच्या त्रासाने तळमळत असताही अजून मुसलमान झाले नाहीत ते अशुद्धच आहेत. पाण्यास त्यांस शिवता येत नाही हे सांगणे नकोच. त्या मुसलमान झालेल्या महारांस शुद्ध झाल्याचे प्रमाणपत्र लिहून देऊन आणि त्यांच्याबरोबर पाणी भरून 'बोले तैसा चाले' असे वागले. आमच्या वाचकांस म्हणूनच आमचा अनुरोध (शिफारस) आहे की आपण सगळ्यांनी प्रत्यही पहाटेच 'त्यांची वंदावी पाउले!'

शुद्धीच्या बातम्या देता देता 'श्रद्धानंद' थकत चालला! फेब्रुवारीत एक हजार अहिंदू कुटुंबे म्हणजे तीन-चार हजार लोक हिंदू मिशनने शुद्ध केले. समारंभ बारा तास चालला होता!

स्वामी श्रद्धानंदांनी जवळ जवळ ६०,००० मलकांना रजपूत मुसलमानांस शुद्ध करून घेतले. तेव्हा त्यांची एका मुसलमान हत्याऱ्याने पिस्तूल झाडून हत्या केली.

पण वर दिलेल्या कलकत्त्याच्या  हिंदू मिशनच्या चालकांनीही श्रद्धानंदांनंतर, गेल्या वर्षात, विशेषतः बिहारमधील गद्दी मुसलमानांस शुद्ध करून घेतले; आणि बंगालमध्ये ५०,००० हजारांवर शुद्धिकार्ये केली. ह्या हिंदूमिशनच्या शुद्धिकार्याचा आकडाही अशा रितीने साठ हजारांवार आल्याने त्याच्या चालकांचीही मुसलमानी आततायांकडून मारले जाण्याची योग्यता सिद्ध झाली होतीच. तिचे सार्थक करण्यासाठी गेल्या महिन्यात श्रीमान् स्वामी परमानंदाजी (प्रो. भाई परमानंद नव्हेत) ह्यांना एका मुसलमानाने सुरा भोसकून घायाळ केले. हा मुसलमान ब्राम्हण वेषाने शुद्ध होणाऱ्या गद्दी मुसलमानांत छपून बसला होता. त्याचे एकदोन वार होताच तो धरला गेला. परंतु परमानंदजी श्रद्धानंदांप्रमाणे मारले न जाता केवळ घायाळच होऊन सुटले.

हे फार वाईट झाले; परमानंदजींवर श्रद्धानंदजींप्रमाणे हत्येस बळी न पडता वाचले हे फार वाईट झाले.

कारण श्रद्धानंदजी वाचले नाहीत म्हणून जशी शुद्धि, वाचली आणि त्यांच्यामागे त्यांच्या न वाचण्यानेच हिंदू मिशनकडून साठ हजार मुसलमान-खिस्त्यांची शुद्धि करवून घेतली, त्याप्रमाणे श्रीमान् परमानंदजींच्या न वाचण्याने आणखी कोणाकडून आणखी कोणा साठ हजार मुल्ला मिशनऱ्यांस शुद्ध करून घेवविले असते. पण परमानंद वाचल्याने शुद्धीस पुन्हा एकदा जोराची चालना मिळण्याची संधि गेली.

परमानंद स्वामींच्या डाव्या हातास घाव झाला आहे. चिंता नाही. अजून उजवा हात आहेच. त्याला घाव लागण्याची संधि येईतो आणखी दहा वीस हजार गद्दी मुसलमानांस तो हात शुद्ध करीलच.

वीस हजार मुसलमानांच्या शुद्धीसाठी एक हात! काही फारसा महाग सवदा नाही झाला हा. अशा दराने आज एक-एक हात कोणीही हाडाचा हिंदु मोठ्या आनंदाने विकील.

हो, हात जर चांगला दाखविता येत असेल तर गोष्ट निराळी. पण तो नुसताच खांद्यापासून लोंबकळत राहण्यापेक्षा वरील बाजार भावाने विकला गेला तरी पुरे.

लाला लजपतरायजींनी भर विधीसमितीत (लेजिस्लेटिव्ह असेंब्ली) ठासून सांगितले की, त्यांनी एकट्याने आजवर जितका पैसा आणि प्रयत्न ‘दलित आणि अस्पृश्य’ म्हणविल्या गेलेल्या जातीच्या उन्नत्यर्थ व्यय केला आहे, तितका ब्रिटिश सरकारने उभ्या शंभर वर्षात केलेला नाही! त्याचप्रमाणे एकटे बिर्ला शेठही दरमहा २०००० रुपये अस्पृश्यांच्या उन्नतीप्रीत्यर्थ व्यय करतात. पण सरकारने अस्पुश्यांच्या उन्नतीसाठी वीस हजार कवड्या देखील दरमहा कधी व्यय केल्या नाहीत.

-आम्ही म्हणतो नसतील. एक कवडी देखील अस्पृश्यांकरिता ब्रिटिश सरकारने व्यय केली नसेल. पण त्यामुळे सरकारवर आरोप तो कोणचा आणि कसा लागू होतो? ब्रिटिश सरकार म्हणजे कर गोळा करणारी सत्ता आहे. ती काय मार्गाने भिकाऱ्यांसाठी मोहरा उधळीत जाणारी कोणी अहल्याबाई आहे की काय! अस्पृश्यांपासून इतरांप्रमाणेच कर उकळण्यात ब्रिटिश सरकार काही

कसूर करीत नाही ना? झाले तर मग अस्पृश्यांसाठी काय अगर कोणाचसाठी काय कराचा व्यय करण्याचे काम काही सरकारी काम नव्हे, ब्रिटिश सरकारी काम उकळण्याचे;-उधळण्याचे नव्हे!

बारडोली पुन्हा कर न देण्याचा सत्याग्रह करणार आहे म्हणे! चौरीचौऱ्याच्या कानात कोणी मध्येच ही बातमी पुटपुटला नाही म्हणजे पुरे! नाही तर तिकडे पुन्हा एखादी चोरवाट मोकळी पडावयाची! चौरीचौऱ्याच्या चोरवाटेने पळून जाण्याची बारडोलीच्या सत्याग्रहाची पुरातन प्रसिद्धि आहे.

-दि. २२ मार्च १९२८

## (७)

# भरतपूरच्या महाराजांस गादीवरून काढावे, कारण काय तर मशीद पाडली

भरतपूरच्या महाराजांस गादीवरून उतरवण्याचा प्रसंग आला होता. थोडक्यात निभावले. पण ते निभावण्याच्या आधी हसन निजामीस स्वर्देव अल्लाजींची काही पत्रे सापडली. त्यावरून निजामीने आपल्या पत्रात प्रसिद्ध केले की, 'भरपूरच्या महाराजांवर हा दुर्धर प्रसंग गुदरला नसता. पण त्यांनी त्यांच्या राज्यात (ते नको म्हणता असता) बांधली गेलेली एक मशीद पडून टाकली म्हणून अल्ला क्रुद्ध होऊन हे संकट त्याने आणले!' निजामीचे हे म्हणणे खरे आहे. अल्ला तसेच जागृत दैवत आहे खरे!

पण रूद्रजीही आताशी काही निजूनच नसतात. तेही थोडेसे जागे झाले आहेत असे दिसते. काण अल्लाजी पाडलेल्या मशदीचा सुड घेण्यास उत्तरेस भरतपूरकडे गेले आहेतसे पाहून गुलबर्ग्यास आपल्या मंदिरांची मागे जी निजामाने पायमल्ली केली तिचा सूड उगविण्यास रूद्रजींनी दक्षिणेस हैद्राबादेवर स्वारी केली. निजामीची दाढी खेचून त्यासही गादीवरून कोलमडून पडू पाहीतो गदगद हलविला आणि हैदराबादेस प्लेगची आग लावून दिली! अल्लाजी देव, तर रूद्रजी महादेव!

***

हसन निजामीस एका स्वर्देवाची ही पत्रे उपलब्ध होण्याचे संधीसच इकडे भोळ्या भारतीयांस 'नाविष्णुः पृथ्वीपतिः' या वचनाधारे भूदेव वाटलेले इंग्लंडचे विगत महाराज एडवर्ड यांचीही काही पत्रे सर सिडने ली यांना उपलब्ध झाली आहेत ती वाचून नास्तिकांची देखील 'नाविष्णुः पृथ्वीपतिः' या शास्त्रावचनावर अढळ निष्ठा बसल्यावाचून राहणार नाही.

त्यापत्रांपैकी एकात 'कर्मवीर' प्रसिद्ध करिते की, लॉर्ड मोर्लेने मि. सिंह यांना जेव्हा व्हॉईसरॉयच्या कार्याकारी मंडळात नेमण्याची व्यवस्था केली, जेव्हा राजे एडवर्ड यांनी लिहिलेले एक अंतःस्थ पत्र आहे. त्यात एडवर्ड १९०१ मध्ये लिहितातः-

'तुम्ही म्हणता व्हिक्टोरिया राणीने हिंदी लोकंस हे वचन दिले; पण ह्याविषयी मला वाटते की, काळ्या मनुष्यास **(Native)** व्हिक्टोरिया अशा साम्राज्याच्या अगदी अंतरंगमंडळात नेमण्याच्या आज्ञेवर कधी स्वाक्षरी करती ना! मला तर अशा घातक कागदावर केवळ निरुपायाने सही करावी लागत आहे!

गजभक्त म्हणून प्रख्यात असलेल्या भारतीयांस -ह्या नेटिव्हांस-साम्राज्याचे अंतरंग मंडळात का मज्जाव असावा ह्या विषयीचा अधिक उहापोह दुसऱ्या एका पत्रात राजे एडवर्ड परम कारुणिकपणे करीत असता लिहितातः-

'साम्राज्याच्या अंतरंग मंडळात कोणत्याही काळ्या माणसांस घेणे हे मला फारच धोक्याचे वाटत आहे! कार्यकारी मंडळात अशा कितीतरी गोष्टींची चर्चा करावी लागते की जी 'नेटिव्हां'समोर करणे अगदी अनिष्ट आहे.' बिचारा सायमन तो तरी अधिक काय म्हणतो आहे!

एडवर्ड राजे पुढे लिहितात : काळा माणूस कितीही चतुर असो, तुमचे कार्यकारी मंडळ त्यास कितीही राजभक्त समजो, तरीही तो कधी आपल्या विरूद्ध जाईल हे कोणास सांगता येणार आहे? तुमच्या गुप्त गोष्टी तो वेळप्रसंगी चव्हाट्यावर आणणार नाहीच म्हणून हमी कशी देता येणार! मी निरुपायाने सही केली तरीही माझे हे विरुद्ध मत नोंदवून ठेवू इच्छितो. काळा मनुष्य प्रसंगी घातक आहे हे मत बदलणे शक्य नाही.'

एडवर्ड महाराजांनी हेही लिहिले आहे की, 'व्हिक्टोरियाही याचे विरुद्ध जाती, इतकेच नव्हे तर माझा पुत्र (आजचे राजे जॉर्ज हे) देखील माझ्याशी सहमत आहे!' बीज तैशी फळे! उत्तम वा अमंगळ!

काळ्यांतील एका चतुर मनुष्यास सुद्धा, तो राजभक्त असला तरी, सरकारच्या नेमणुकीनेही नुसत्या व्हॉईसरॉयच्या कार्यकारी मंडळात बसविण्याइतका विश्वासदेखील त्या लोकांवर ठेवण्यास परमदयाळू महाराजे एडवर्ड सिद्ध नव्हते; इतकेच नव्हे, तर ते आणखी एका पत्रात लिहितात कीः-

'मला हे वाचून आश्चर्य वाटले की, भारतमंत्र्यांशी होणारा पत्रव्यवहार काळ्या लोकांस दाखविला जातो; इतकेच नव्हे तर तुमच्या गुप्त कागदपत्रांच्या प्रती 'नेटिव्हच' करितात ही पद्धती फार भयावह आहे! मला ती फारच आपत्तिजनक वाटते!'

कार्यकारी मंडळात एक अधिकारी म्हणून नेमला जाणारा 'नेटिव्ह' अयोग्य आहे, इतकेच नव्हे तर नुसत्या कागदांच्या प्रती करण्याच्या कारकुनीच्या जागेसही हे काळे पाय लागणे हितावह नाही!

तरी देखील परमदयाळू एडवर्ड महाराजंनी शेवटी एक 'नेटिव्ह' व्हॉईसरॉयचे कार्यकारी मंडळात नेमून दिला! कोण प्रजावात्सल्य हे!

ही दुःखाची गोष्ट आहे की, ह्या प्रजावत्सल पुरूषाची ही मनिषा तेवढी अपूर्ण राहून गेली की, 'तुम्ही नेटिव्हांना हा जो चंचुप्रवेश करू दिलात त्याचा मुसलप्रवेश होण्याचे आधीच तो नेटिव्हांस दिलेला अधिकार परत घेण्याचे धैर्य दाखविण्यास आता दुसरा एखादा, तसाच निधड्या छातीचा मनुष्य पाहिजे.'

हा जो तसाच निधड्या छातीचा मनुष्य एडवर्ड महाराजांस पाहिजे होता तोच तर हा सायमन नसेल ना?

***

असल्या दैवी राजवटीत साधारण सृष्टीतही दैवी विपर्यास घडणारच. ते पहा. बिहारमध्ये एका बकरीने मनुष्यासारख्या प्राण्यास जन्म दिला आहे! ठिकच आहे ते. जर मनुष्यप्राणी आज हिंदुस्थानात बकऱ्यासारख्या प्राण्यास धडाधड जन्म देत आहेत तर बकरीने मनुष्यासारख्या प्राण्यास जन्म द्यावा यात काय नवल!

जर रशियात एखादी बकरी मनुष्यास जन्म देती तर नवल! कारण तिथे मनुष्य-मनुष्यिणी बकऱ्यास जन्म देत नाहीत ही गोष्ट तिकडच्या मनुष्यमनुष्यिणीचे वेलफर्ड वेलाकने काढिलेले खालील चित्रच समर्थील. ते म्हणतात.

'मी रशियात शिरलो तेव्हा मला सांगण्यात आले की, ब्रिटिनने रशियाशी संबंधविच्छेद केला तेव्हा सर्व रशियाभर रणोत्साह पराकाष्ठेला पोचला. मातृभूवर परकीयांची स्वारी होण्याचा संभव

आहे हे सिद्ध करण्यास जो तो पुढे येतो. मुलगेच नव्हे तर मुलीही सैनिकी शिक्षण शिकू लागल्या. श्रमिक लोकांच्या शाळांतून सक्तीच्या सैनिक शिक्षणाइतके वय झालेले नसताही कोवळी मुले स्वेच्छेने हट्ट धरून बसली की, आपलीही सैन्ये संघटविण्यात यावी. महायुद्धाचे दिवस सोडले तर रशियात मला आज आढळत आहे असा रणोत्साह मी कधीही पाहिला नाही. विशेषतः सप्टेंबर चारला मी ते दृश्य पाहिले त्याचा माझे मनावरच फार परिणाम झाला. तो युवक संघाचे प्रदर्शनाचा दिवस होता. जवळ जवळ पांच लक्ष तरुण मुलांची सैनिक पथके मॉस्कोच्या लाल चौकातून त्या दिवशी चाल करून गेली. शेकडो प्रकारांनी त्या युवकसंघांनी रशियाचे सशस्त्र संरक्षण करण्याचा आपला निश्चय व्यक्त केला. त्या दिवशीचा तो उत्साह आणि निर्धार अपूर्व होता. खरोखर रशियावर स्वारी करणाऱ्या कोणत्याही राष्ट्राची कीव यावी असे ते युवक संघीय प्रदर्शन होते. कारण जगातील कोणत्याही राष्ट्राच्या धनिक सत्तेची अशा युवक सेनेविरुद्ध लढाई करण्यासारखे सैन्य धाडण्याची छातीच नाही! त्या सगळ्या रशियन तरुणांच्या क्रोधाचे मुख्य लक्ष्य इंग्लंड होते. ऑस्टिन चेंबर्लेनच्या पुठ्ठ्याच्या प्रतिमा ठिकठिकाणी अपमानित करण्यात येत होत्या. जो त्या प्रतिमेस अचूक वेधिल त्या युवकास पहिल्या प्रतीचे पारितोषिक मिळे!'

असल्या सशस्त्र प्रदर्शने करणाऱ्या सिंहासारख्या दंतनखयुक्त युवकसंघाचे देशात मनुष्यास जन्म देण्याची बकऱ्यांची काय माय व्याली आहे!

ह्या दंतनखयुक्त क्रुद्ध युवकसंघाची सैनिक सशस्त्र प्रदर्शने पाहून विल्फर्ड विलॉक ह्यांच्या अंगावर जगात अजून भयंकर रक्तपाताची युद्धे घडणारच आहेत असे वाटून शहारे उभे रहिले, म्हणून ते म्हणतात, 'पण हे शहारे उठवून घेण्यास ते त्या 'तामसी' रशियात गेलेच कशाला; युवकसंघाची सशस्त्र प्रदर्शने पाहून त्यांच्या अंगावर जसे शहारे उठले, तसेच या सात्त्विक हिंदुस्थानात जर ते आले असते तर आमच्या युवकसंघाच्या हसतमुख परिषदा पाहून त्यांच्या अंगास गुदगुल्या झाल्या असत्या गदगुल्या! सात्त्विक युद्ध जगाने कशी लढावावी हे जगास शिकविण्यासाठी परवा सायमन कमिशची स्वारी हिंदुस्थानवर येताच युवक परिषदांनी नावांतून बसून नुसते हातरुमाल उडवीत त्यास अडथळा केला आणि सांगितले की, 'जा! परत जा! तुमची स्वारी आम्हांस नको आहे.' इतकेच नव्हे, तर एका तामसी सार्जंटाने त्यांच्यावर सोटे चालविले तरीही आपले सत्व ढळू न देता त्यांनी निधड्या छातीने कोर्टात फिर्याद देखील लाविली! ह्या विद्यार्थ्यांनी हा किंचित मात्र तरी तामसीपणा दाखविला पण बाकी हजारो हजार विद्यार्थी तर केवळ चहा, चिवडा आणि चिरूट पीत, खात आणि ओढीत आपल्या देशाचे तोंड निर्भेळ सत्वगुणाची सफेती फासून उज्ज्वल करीत होते.

केवळ मद्रासला तेवढी थोडी दगडफेक दंडादंडी इत्यादी तामसी प्रकार झाले खरे; नाहीतरी मद्रासी लोक मिर्च्या फारच खातात!

असले तुरळक अपवाद सोडले तर बाकी सर्व दंतनखविहीन सात्त्विक कढीभात! उगीच नाही ह्या देशात बकऱ्या मनुष्यास जन्म देत!

-मार्च १९२८

## (८)

# शुद्धीच्या नावाखाली गोमंतकात राजकीय चळवळ ‘टाइम्स’चा शोध

मुंबई ‘टाइम्स’ला असा एक अद्भूत शोध लागला आहे की, गोमंतकात जे शुद्धिकार्य चालले आहे त्याच्या बुरख्याखाली राजकीय चळवळे मोठी उलाढाल करू पाहत आहेत. ते म्हणते, ‘ब्रिटिश हिंदुस्थानातील महाराष्ट्रीय जहाल पुर्तगीज हिंदुस्थानातील तरुण जहालांशी संगनमत करीत आहेत की, गोमंतकास महाराष्ट्रात संयुक्त करून ह्या अखंड महाराष्ट्राचे एक स्वतंत्र आणि बलाढ्या राज्य स्थापावे!’ ईश्वर करो आणि बोलाफुलास गाठ पडो!!

‘टाइम्स’ने जसा हा अचूक शोध इकडे महाराष्ट्रात लाविला, तसाच कलकत्त्यासही पोलंडच्या एका गोऱ्या ज्योतिष्याने आणखी एक त्याहूनही अद्भूत शोध लाविला होता. तो ज्योतिषी म्हणाला, ‘मी बारा वर्षे हिंदुस्थानात ज्योतिषादिक अभ्यास करण्यात घालविली असून माझी भविष्ये अचूक असतात. येत्या मार्च २२ ला फार मोठा भूकंप होऊन सर्व हिंदुस्थान त्यात ‘गडप होणार आहे!’ ह्या भयंकर ‘गडगडाटात’ सायमन कमिशनसहच हिंदुस्थान गडप होणार होते की एकटेच, ते त्याने काही स्पष्ट सांगितले नाही!

मारवाडी बाजारात ह्या भविष्याने मोठी गडबड उडविली. कित्येक लोक अत्यंत चिंतातूर झाले. परंतु इंग्रजी राज्यातील हम करे सो कायद्यास कंटाळलेले चळवळे लोक मात्र उलट अत्यंत आनंदभरित दिसू लागले. कारण त्या बेबंदशाहीतून हिंदुस्थानची सुटका करण्याचा हा सुलभतर आणि उत्कृष्टतर मार्ग होता! आम्ही एवढ्या चळवळ्यातील एक अनत्याचारी, अहिंसक प्राणी असल्याने मार्चच्या २२ व्या दिनांकास हिंदी स्वातंत्र्यदिनासारखा सुवर्ण दिवस समजून त्याची वाट पाहत बसलो. एवढ्या भूकंपात-ज्यात हिंदुस्थानचे हिंदुस्थान गडप होणार - त्यात बूच न लावले तर आपली दौत सांडून जाईलच हीही गोष्ट आनंदाने भरात आम्ही विसरून गेलो! आमच्या शेजारच्या पानविडीवाल्या दुकानदाराने मात्र ‘भूकंप होऊ देऊ नकोस देवा! मी एक मूठभर तांदूळ त्या ज्योतिष्यास देईन’ म्हणून नवस केला होता!

मार्चची २३ वा दिनांक उजाडला! पहतो तो न हिंदुस्थान गडप झाले न इंग्रजी राज्य! फार काय, बूच न घातलेली ती आमची दौत देखील उपडी झाली नाही!

तो पानविडीवाला म्हणाला ‘मोठे गंडांतर टळले!’ परंतु त्या भविष्यावादी गोऱ्यास जो तो सतावू लागला आहे की, ”तुझे भविष्य खोटे ठरले,“ अशी बातमी आली. तेव्हा तत्काळ त्या पानविडीवाल्याने आपण मूठभर तांदूळ अर्पिण्याचा केलेला नवस त्या ज्योतिष्यीबुवांस कळविला.

आता त्या ज्योतिष्यीबुवांनी घाबरून जाण्याचे काही कारण नाही. त्यांनी चापून सांगावे, ‘भविष्य चुकले नाही, भूकंप होऊन हिंदुस्थान गडप झालेच असते. पण गणित ज्योतिषांस फलज्योतिषाचा जो हातचा नेहमीच ठेवलेला असतो, त्याचे प्रतापाने ह्या पानविडीवाल्याने मूठभर तांदूळाचे जे दान

दिले त्यामुळे तो भूंकप टळला. नाही तर झालाच असता. गणित ज्योतिषही बरोबर ठरले-फल-ज्योतिषही खरे ठरून भविष्यवाद्यांच्या पोटास भात मिळण्याचीही व्यवस्था अखंड राहिली.

***

ही झाली भविष्य कसे होईल हे सांगणारांची गोष्ट. आता भविष्य कसे व्हावे ते सांगणाराकडे थोडेसे वळू.

विलायतेच्या 'स्पेक्टेटर' नावाच्या पत्रात भारताच्या सर्व आपत्तींचा परिहार करणारा भविष्यकाळ कसा आणता येईल ह्याविषयी चर्चा करून त्याचा उत्तम उपाय म्हणून एका मुसलमानाने असे सुचविले आहे की, 'हिंदुस्थानचे सर्व राज्य दिल्लीच्या मोगल बादशहाच्या कोणातरी वंशजाकडे सोपवावे म्हणजे तो ब्रिटिश सत्तेखाली हिंदुस्थानची बादशाही उत्तमपणे चालवील.' असे झाले तर वारसहक्काचा हा एक अपूर्व विजय होईल.

मोगल बादशहाच्या कोणातरी वंशजाकडे भारताचे राज्य सोपविण्याच्या ह्या आमच्या मुसलमानबंधूच्या सूचनेस आमचा महाराष्ट्राच्या वतीने पूर्ण पाठिंबा आहे. कारण वारसहक्काच्या ह्या विजयाने जुन्या मोगल बादशाहीच्या वंशजाकडे हिंदुस्थानची बादशाही येताच, जुन्या पेशव्यांच्या वंशजाकडे चौथाई आणि सरदेशमुखीचा वारसाही महाराष्ट्राकडे अनायासचे येऊन तो वसूल करता करता महादजी शिंद्यांच्या कोणातरी वंशजासही त्या मोगल बादशहास पेन्शन देऊन सर्व बादशाही आपल्या खिशात केवळ त्याच वारसाहक्काने घालता येईल.

हिंदुसभेच्या वतीनेही ह्या सूचनेस अवश्य पाठिंबा मिळावा. कारण आता मुसलमानांस शुद्ध करून हिंदू करता येणे अगदी सुलभ झाल्याने त्या मोगलाच्या 'कोणातरी वंशजा'स बादशाही मिळताच त्यासच हिंदू करून घेता येईल. हिंदुसभेचे मुख्य कार्यवाह पं. नेकीराम दिल्लीसच बादशाहीवाड्याच्या एका हाकेवर राहतात.

एकवेळ ह्या मोगल बादशहाचा कोणीतरी वंशज पुरवेल. पण त्या क्रांतिकारकांच्या वंशजांचे नाव देखील ऐकणे नको असे इंग्रजांस झाले आहे. कारण वरील मुसलमानांच्या सूचनेचा कोणीही इंग्रजी पत्रास राग आलेला दिसत नसला तरी सध्या गेला एका वर्षाचे आतच ज्या क्रांतिकारकांच्या पांचसहा तुरळक उठावण्या झाल्या आणि त्यांचे कटाचे खटले देवधर इत्यादी ठिकाणी अजूनही चालेले आहेत, त्यांची बातमी ऐकून पत्रे अगदी संतप्त झाली आहेत. पंजाबच्या श्रीमती पार्वतीदेवीचा एक तरूण मुलगाही ह्या कटात गवसल्याची बातमी आहे. अशा उच्च कुलीन हिंदुंच्या डोक्यात हे वेड कसे संचारले आहे ते इंग्लिश लोकांस विशद करून दाखविण्याचे कार्य ए.जी. वुलेकाट नावाच्या इंग्लिश लेखकाने केले आहे.

'भारतीय देशभक्त' ह्या मथळ्याखाली ह्या वुलेकाटसाहेबाने गेल्या एक दीड वर्षातील बऱ्याच क्रांतिकारक कटांची माहिती प्रसिद्ध केली आहे. त्यात काकोरीच्या क्रांतिकारकांच्या कटाचे वर्णन अर्थातच पुष्कळ विस्ताराने दिले आहे. त्याचा प्रत्येक शब्द रागाच्या लाल शाईने अगदी रंगून गेलेला आहे.

स्वदेशस्वातंत्र्यार्थ आपल्या प्राणांचाही बळी देणाऱ्या ह्या 'भारतीय देशभक्तांस' वुलेकाटसाहेबांनी ज्या दहा शिव्या हासडल्या आहेत, त्यांचे स्थली दहा हजार हासडल्या असत्या

तरी देखील ह्या 'भारतीय देशभक्तां'ची कहाणी त्याने युरोपच्या- निदान इंग्लंडच्या तरी कानावर एकदाची घातली ह्याविषयी आम्ही वुलेकाटसाहेबांचे मनःपूर्वक अभिनंदन करतो. हिंदुस्थानातील वर दिलेल्या एक हजार गालभरू '**My Lord**' वाल्या व्याख्यानांनी इंग्रजांचे कान जसे टवकारले जात नाहीत, तसे केवळ ह्या एका कहाणीने जातात- हिंदुस्थान दरिद्री आहे, आम्ही भूकेने मरतो इत्यादी डोळ्यात पाणी आणणाऱ्या 'डोळेभरू' कहाण्या ऐवजी ह्या क्रांतिकारकांच्या 'डोळेवटारू' कहाण्या सांगण्याची हौस आम्हा कोणीही हिंदी मनुष्यास नसल्याने, ते कार्य वुलेकाटसाहेबांनी करून हिंदुस्थानची डोळेभरू आणि डोळेवटारू अशी दोन्हीही स्वरूपे इंग्रजांस परिचित करून दिली ह्याविषयी वुलेकाटसाहेबांस कोणीही सत्यप्रित्य मनुष्य धन्यवादच देईल. त्यामुळे हिंदी राजकारणाच्या दोन्ही बाजू इंग्रजांस कळतील.

त्यांच्यात फरक हाच असतो. ह्या 'डोळेवटारू' देशभक्तांच्या अशा दांडग्या कहाण्या आमच्या आम्हासही सांगताना देखील सभ्य लज्जाशीलतेमुळे आम्हा हिंदी लोकांना अगदी कसेसेच वाटते. त्या दुसऱ्या कोणी सांगितल्या तर ऐकता मात्र येतात चोरून चोरून.

सायमन कमिशवर अविश्वास असल्याचा आरोप जेव्हा वरिष्ठ विधिसमितीत (लेजिस्लेटिव्ह असेंब्लीत) झाला, तेव्हा त्या उत्तेजनेत 'हिंदुस्थान टाइम्स'च्या वार्ताहराची लिहावयाची एक हातपेटी वरून सज्जातून धाड्दिशी खाली पडली! पडली तर पडली; पण अगदी नेमकी सर ब्लंकेटसाहेबांचे डोक्यावर पडली तत्काळ ब्लॅकेटना धक्का बसून क्षणभर मूर्च्छना आल्यासारखे झाले. पण एकंदरीत निभावले. फार वाईट झाले!

त्यातल्या त्यात इतके बरे झाले की, त्या वार्ताहरावर खटला भरला गेला तेव्हा त्याने लप्पंछप्पं न करता आपले खरे ते सांगून टाकले की, 'सर बेसिल ब्लॅकेट साहेबांच्या हिंदी हिताविरूद्ध झालेल्या भाषणामुळे मला इतकी उत्तेजना आली की, माझ्या हातातील सामान मी कसे आणि कुठे ठेवीत आहे ते मला भानच राहिले नाही.' त्या बेभान वृत्तीत तो पोकळीवरच हातपेटी ठेवता झाला. पण पोकळी बेभान झाली नसल्याने तिने तिच्या मूळस्वभावाप्रमाणे पेटीला तशीच खाली पडू दिली!

त्या वार्ताहाराला दंड का थोड्याशा बंदीची- पण लहानशी शिक्षा झाली आहे. म्हणे थोडी अधिक शिक्षा झाली तरी ठीकच होते. कारण जर का कागदाच्या हातपेटीचे स्थली त्याचे हाती दुसरे तिसरे काही असते तर केवढा आकांत उडाला असता!

बेभान झाला म्हणून काय झाले- इंग्रजांच्या डोक्यावरचे हाड हातपेटीने देखील दुखावण्या इतकेच कोणाही हिंदी मनुष्याप्रमाणेच मानवी असते- आणि इंग्रजांसही मूर्च्छा येऊ शकते इतके भान देखील त्यास राहू नये की काय? -दि. १९ एप्रिल १९२८

**(९)**

# तुर्की मुलींना अमेरिकन शाळेत घालू नका!

आपल्या देशातील अमेरिकन शाळेत तुर्की मुली पाठविण्याचे काम चालते असे दिसून आल्यावरून, तुर्की सरकारने ब्रुसा येथील मुलींची अमेरिकन शाळा बंद केली. तुर्कींनी आपल्या मुली

तुर्की शाळेतच घालाच्या असे आज्ञापत्र तुर्की सरकारने काढले आहे. केमाल पाशा स्वतः कुराण मानीत नसेल तरी तुर्की मुलींनी ख्रिश्चन होऊ नये यास्तव ते सरकारची सक्ती देखील उपयोगात आणतात. हे ह्यावरून उघड होत आहे. कारण असे वाटणे म्हणजे नुसत्या धर्मस्वातंत्र्याचा प्रश्न नव्हे,त्यात संस्कृतीचा, राष्ट्रीय एकतेचा राष्ट्रीय संख्याबलाचा प्रश्न आहे, असे केमाल पाशांना वाटत आहे. काय खुळा बेटा! आमच्या इकडचे काही 'शिवशिव न हिंदुर्न यवनः' बोल-शहाणे हे केमालपाशास, 'तुर्की काय, ख्रिश्चन काय? तुर्कस्थानच्या राष्ट्रीय ऐक्यासाठी द्याना तुमच्या तुर्की मुली त्या ख्रिस्त्यांना' असा अनत्याचारी उपदेश देतील तर बरे होईल.

म्हणूनच गेल्या एका श्रद्धानंदात म्हटले होते की केमालपाशा जरी उद्या हिंदुस्थानावर राज्य करण्यास आला, तरी तो महंमद अल्ली होणारच नाही असे आम्हांस म्हणवत नाही. कारण मुसलमानीपणा धर्म म्हणून त्यांनी अंगीकारला नसला; तरी तुर्की संस्कृती म्हणून तो काही तरी मानीत असलाच पाहिजे. ख्रिश्चनांच्या ह्या तरुण तुर्कांनीच आर्मेनियात कत्तली केल्या, त्या काही कुराण बायबलातील ईश्वरविषयक तत्वज्ञानात, धर्मात भेद आहे म्हणून नव्हेत; तर ख्रिश्चन संस्कृती आणि तुर्की संस्कृती, ह्या उभयांची जाती, नीती, राष्ट्रीयता ह्यात भेद आहे म्हणून होय. एवढ्यासाठीच शुद्धि ही हिंदुत्वाची चळवळ आहे- नुसती धार्मिक म्हणजे तत्वज्ञानाविषयक वितंडवाद नव्हे, ज्या कारणासाठी कुराणस आप्तवाक्य न मानणारा तुर्की राष्ट्रीय पक्ष ख्रिश्चनांनी तुर्की मुली बाटवू नये म्हणून त्यांच्या शाळा सक्तीने बंद पाडतो, त्याच कारणासाठी हिंदु मुली बाटविल्या जाऊ नयेत म्हणून हिंदू संघटन झटते. शुद्धि म्हणजे काय ते आम्हास कळतच नाही असे म्हणणाऱ्यांनी तिचा अर्थ केमालपाशापासून तरी शिकावा.

परम दयाळू हिंदुस्थान सरकारने चित्रकलेविषयी विशेष ज्ञान मिळविण्या करता काही हिंदी चित्रकारांस शिष्यवृत्या देऊन युरोपात पाठविण्याचे ठरविले आहे! झाले. आता हिंदुस्थानच्या भाग्योदयास काय उशीर!

कारण हिंदुस्थानची जी अत्यंत दुर्बळ दास्यग्रस्त दरिद्रावस्था झालेली आहे की त्यास 'चित्रकलेचे' विशेष ज्ञान' नव्हते म्हणूनच होय!

बाकी सारे ज्ञान विज्ञान त्याला करतलाकमलवत् झालेलेच आहे. मशीनगन्स, विमानपटुता, संचालन, विध्वंसिका, पाणबुड्या, सैनिक कौशल्य, विषारी धूर, विषारी धूराची प्रतिकार करणारी रसायनशास्त्रे इत्यादी प्रबल राष्ट्रास अत्यंत अवश्य, ती ती कला शिकण्यास हजारो विद्यार्थी हिंदुस्थान सरकारने आजवर विदेशी धाडून हिंदुस्थानात ते येताच त्यांची मोठमोठी सबल पथके हिंदुस्थानचे संरक्षणार्थ सज्ज करून ठेविलेलीच आहेत! राहता राहिली होती चित्रकला! म्हणून आता तीही शिकण्यास विद्यार्थी विदेशात धाडण्यात येणार आहेत. ते एकदा का परत आले की मग काय छाती लागली आहे, त्या रशियनांची किंवा अफगाणांची ह्या हिंदुस्थानावर स्वारी करावयास! ते तर काय, ह्या चित्रकलेत एकदा का हिंदुस्थान तज्ज्ञ झाले की, इंग्रजी पलटणे देखील पळून जातील पळून!

सिद्दीक नावाच्या एका मुसलमानाने आपल्या हिंदूतील लिंगायत पंथाचे संस्थापक श्रीमान् चन्न बसेश्वर ह्यांचे आपण अनुयायी आहोत असे प्रथम प्रसिद्ध करून, आता त्याच श्रीबसेश्वरांचे

नावाखाली हिंदूस मुसलमानी धर्म हाच अत्युत्तम धर्म आहे म्हणून दीक्षा देण्यास आरंभ केला आहे! आगाखानही कलंकी अवताराच्या नावानेच हिंदूस मुसलमानी दीक्षा देत असतात! ते ठीकच आहे. कारण-

ख्रिस्ती पुराणात अशी एक अनुश्रुति आहे की, सैतान प्रथम आपल्या स्वतःच्या नावानेच लोकांस सैतानी पंथाचा उपदेश देऊ लागला. पण आस्तिक लोक ते सैतानाचे मत आहे असे ऐकताच ते ऐकण्यास सिद्ध नसत हे पाहून चिंतायुक्त स्थितीत सैतान विचार करीत असता त्याला आपल्या जाळ्यात आस्तिकांस देखील सहज ओढण्याची एक युक्ती सुचली तेव्हा.

**The devil said with wink and nod**
**The wisest way to work my will**
**Is to call it the will of God!**

सैतान डोळे मिचकावीत आणि मान हलवीत उद्‌गारला : उत्तम युक्ती सुचली! माझ्या सैतानी अच्छा लोकांकडून पूर्ण करवून घेण्यास उत्कृष्ट मार्ग म्हणजे त्या सैतानी इच्छेस ही देवाची अच्छा आहे म्हणून प्रसिद्ध करणे हा होय. देवाच्या नावाने पुढे आले की, भाबडे लोक सैतानाची देखील पूजा करतील!

ह्याच युक्तीचा अवलंब करून मुंबई, ठाणे इत्यादी जिल्ह्यातून काही पाताळयंत्री हसन निजामीवाले हिंदु अवधूताच्या वृत्तीने संचारत आहेत आणि जनतेस आकर्षित करीत आहेत म्हणे! सुवर्णमृगात मारीच लपलेला असतो हे सीतेस देखील कळले नाही; मग जनतेची कथा काय? लक्ष्मणाची चेतावणी व्यर्थ गेली, तिथे आम्ही काय चेतावणी देणार- पण आपले सांगतो की हे खरेच असेल, तर सावधान! ब्राम्हणवेषात येऊन एका मुसलमानाने गेल्या महिन्याच हिंदुसंघटक स्वामी परमानंद यांस विहारात भोसकले होते हे हिंदूनी विसरू नये. नाणे पारखून घ्यावे- निदान बद्द आवाज येताच भिरकावून द्यावे.

ही चेतावणी हिंदूस दिली; त्यामुळे मुसलमान बंधूसही लगेच एक चेतावणी देऊन टाकणे भाग आहे. नाही तर हिंदुमुसलमानांस समानतेने न वागविल्यामुळे तुम्ही 'एकी' बिघडविता म्हणून 'राष्ट्रीयता' रागावेल! ह्यासाठी मुसलमानांसही एक चेतावणी देत आहोत की,-

मथुरेत गेल्या महिन्यात एका धर्मनिष्ठ मुसलमानाने एका हिंदू स्त्रीस आपले घरात कोंबून टाकिली ही काही नवीन गोष्ट नव्हे ही प्रत्यहीचीच घटना आहे. पण नवीन जे झाले ते हेच की, त्याचा हिंदूंस राग आला! प्राहूनही नवीन गोष्ट म्हणजे त्या नष्ट हिंदूनी एकत्र होऊन मोठा दंगा केला! आणि त्याहूनही नवीनतम नवलीची गोष्ट म्हणजे त्या हिंदू मुसलमानांचे दंग्यात हिंदूच हिंदू न मरता सगळे मुसलमानच मुसलमान दगावले!!!. एक बिचारा मुसलमान मारला गेला आणि वीस बिचारे मुसलमान घायाळ झाले. आता दंग्यानंतर पोलिसांनी उत्कृष्ट बंदोबस्त केला आहे. लाठी घेऊन फिरण्यास मनाई करून धरपकड होऊन खटलाही भरला आहे.

परंतु आता ते सर्व जरी उत्कृष्टपणेच पार पडत आहे तरी मुसलमान बंधूंनी एक गोष्ट मात्र आता विसरून चालणार नाही की, हिंदूंची एखादी यःकश्चित स्त्री देखील आता पूर्वीइतकी स्वस्त राहीली नाही! मथुरेचा ७ मार्चचा दंगा मुसलमानांस हिच चेतावणी देत आहे की, ह्यावरही तुम्हांस एखादी दुसरी हिंदू स्त्री चालता चालता धरून घरात कोंबावीशीच वाटली, तर आपले एकाचे शिर आणि

वीसांचे भयंकर घाव एका रुमालात गुंडाळून घेऊन मग त्या मुदलावारी तो सवदा करण्यास निघावे. कारण दिवसेंदिवस आताशी प्रत्येक हिंदू पदार्थाचे बाजारभाव असे वाढतच आणि कडाडतच जात आहेतसे दिसते.

-दि. २६ एप्रिल १९२८

## (१०)

# निजामीची तळी उचलणारे मुसलमान

पुण्यास हैदराबादच्या अत्याचारी आणि हिंदूविद्वेषी राज्यपद्धतीविरूद्ध जी परिषद झाली, तिचा निषेध करण्याकरिता आणि निजामाची तळी उचलून धरण्याकरिता मुससमानांचीही सभा पुण्यात भरावी हे साहजिकच होते. नोकऱ्यांप्रमाणे सभांमध्येही स्वतंत्र आणि विरोधी प्रतिनिधीत्व हवेच.

त्या सभेत मुसलमानांनी ठासून विचारले आहे की, निजामाने जसे केव्हा हिंदू दिवाण नेमले आहेत तसे कोणा हिंदू राजाने मुसलमान दिवाण नेमले आहेत की काय? दाखवा!

ह्या त्यांच्या आव्हानावरून म्हैसूरला मध्यंतरी जो मुसलमान दिवाण नेमला होता तो हिंदू झाला की काय अशी शंका येते! शुद्धीच्या युगात कोणचा मुसलमान केव्हा हिंदू होईल ह्याचा काही नियम राहिला नाही बुवा!

सभत मुसलमानांनी असाही एक ठराव केला की, ‘ब्रिटिश सरकारच्या आणि निजामाच्यामध्ये जो स्नेहसंबंध सतत वसत आला आहे, तो हिंदूंच्या असल्या दुष्ट ओरडीने बिचकून बिघडून जाऊ नये!’ आमचीही हीच प्रार्थना आहे. ज्या ‘सतत आणि अखंड स्नेहसंबंधा’ने आणि सकोमल प्रेमभावनेने प्रेरित होऊन ब्रिटिशांपाशी निजामाने आपल्या मित्राची आपण वाटेल ती वस्तू आपलीच समजून जशी संकोच सोडून मागतो, तसा वऱ्हाड मागितला आणि ब्रिटिश सिंहाने पण मित्रच मित्रास जसे प्रेमाने ‘देत नाही जा!’ म्हणून केव्हा केव्हा निःसंकोचपणे हसत म्हणतो तसे दात दाखवून ‘देत नाही जा!’ म्हटले- इतकेच नव्हे; तर अगदी जीवश्चकंठश्च मित्राप्रमाणे निजामाच्या स्वतंत्र अस्तित्वाच्या भावनेच्या जिवाशी लगट करून, कंठाशी चोवीस तासांच्या आत उत्तर मागणारा पंजा बिलगविला- तशा प्रकारचा स्नेहसंबंध ब्रिटिशांच्या आणि निजामाच्यामध्ये सतत टिको अशी आमची प्रार्थना आहे! तो तसा लोभ आहे ह्याहूनही थोडास वाढला तरी देखील आमची ना नाही. ह्या निजाम आणि इंग्रज ह्यांच्यात वसत आलेल्या स्नेहसंबंधाची पराकाष्ठा होऊन, त्या दोन जिवांच्या वऱ्हाडास कर्झनने जसा एक करून टाकिला, तसा अनुभव हैदराबादेलाही होवो आणि आमच्या त्या स्नेहसंबंधांस हपापलेल्या पुण्याच्या मुसलमानांचे तोंडात साखर पडो!!

मुसलमानांचा ‘मुबलिक अखबार’ आपल्या १ डिसेंबरच्या अंकात लिहितो, की महंमद फरूख साहेब ह्या ‘उलम-अ-इस्लाम’ पत्राच्या संपादक असलेल्या पंजाबातील थोर गृहस्थांनी पंजाब गव्हर्नरला खालील तार देऊन मुसलमानांची एक महत्वाची मागणी पुढे आणली आहे. ‘ज्या अर्थी मुसलमानांच्या धर्माचा रोख मूर्तिपूजेविरूद्ध आहे आणि ज्या अर्थी हिंदूंच्या मूर्तींच्या मिरवणूकी पाहताच त्यांस उद्वेग येणे साहजिकच आहे, त्या अर्थी सरकारने हिंदूंच्या मूर्तींच्या मिरवणुकी मुसलमानांच्या मशिदीवरून नव्हे; तर, दुकानांच्याही समोरून जाऊ देऊ नयेत. सरकार न्यायी आहे आणि मुसलमानांचा उत्क्षोभ भडकण्याचे आधीच ते त्यांची मागणी मान्य करून त्यांस संतोषित करील अशी आम्हास आशा आहे.’-(अर्जून)

वरील मागणी करायचे धैर्य दाखविले म्हणून ‘एडिटर साहेब’ महंमद फरूख ह्यांचे आम्ही आभार मानतो. मुसलमानांनी पत्रांतून काय चालले असते ह्याची वार्ता आपणांस किती कमी मिळते ह्याचे

हे उदाहरणच आहे की, ह्या मुसलमानी पत्रांच्या डिसेंबरच्या अंकात काय लिहिले त्याचा पत्ता आज आम्हांस, आज सहा महिन्यांनी, लागत आहे! हिंदूंनी मूर्तीपूजा आणि मूर्तींच्या मिरवणुकी मुसलमानांच्या समोर, शेजारी किंवा जवळ करू नयेत कारण मूर्तीपूजा मुसलमानी धर्माच्याविरूद्ध आहे! ही मुसलमानांची मागणी त्यांनी अनेकदा स्पष्टपणे सांगून टाकिली हे त्यांचे हिंदूवर खरोखर उपकार आहेत.

खरोखर हे हिंदूवर उपकार आहेत. कारण आम्ही मुसलमान म्हणूनच आमच्या धर्माचा खलिफा तो तुर्क त्याच्याशी लढणार नाही म्हणन जेव्हा मुसलमान म्हणाले आणि जेव्हा हिंदूनीही त्यांच्या त्या कोटिक्रमास त्याच धार्मिक कारणाकरिता दुजोरा दिला, तेव्हाच मुसलमानांच्या धार्मिक समजूती हिंदूनाही बंधनकारक आहेत ते तत्व सिद्ध झाले. खलिफाशी लढत नाही कारण ते मुसलमानी धर्माच्या विरूद्ध आहे. आमच्या मशिदीसमोर तर काय, पण घराशेजारी शंख घंटाही वाजवू देणार नाही, कारण ते मुसलमानी धर्माच्याविरूद्ध आहे. अशी विचारपरंपरा ज्या मूलतत्वाच्या उपजाऊ कुसव्यातून आपोआप प्रसवली, त्या विचारपरंपरेला मान तुकवून मशिदीसमोर वाद्ये बंद करितो असे हिंदू मुसलमानांच्या एकीचे हिंदू भोक्ते म्हणू लागताच त्या पुढची पायरी चढून मूर्तीपूजा बंद करा, कारण तीही मुसलमानी धर्माच्या विरूद्ध आहे म्हणून मुसलमान मागणी करण्यास चुकणार नाहीत असे अपरिहार्य अनुमान आम्ही काढले होते. तेव्हा काही भाबडे हिंदू आमच्यावर रागावत आणि म्हणत, 'छट् आमचे मुसलमान भाई असले अतिरेकी नाहीतच तुम्ही हिंदूच खोडसाळ आहा; नाही तर असे भय अशा शंका तुम्हांस आल्याच नसत्या!' पण आमच्या पंजाबातील मुसलमानांपैकी काही पुढाऱ्यांनी तीच-अगदी तर्कशास्त्राची लाज राखली! म्हणूनच आम्ही त्यांचे हे उपकारच झाले असे म्हटले आहे.

'वाद्ये बंद करा म्हणताच लोण्याहून मउ हिंदूंनी मंडळे नेमून मुसलमान मौलवींची मते मागविली की, 'वाद्ये मुसलमानी धर्माविरूद्ध खरीच आहेत काय?' आता हे सद्गृहस्थ पुन्हा मूर्तीपूजेच्या प्रश्नास्तव मौलवी मंडळ नेमतील, आणि त्यांनी मूर्तीपूजा मुसलमानी धर्माविरूद्ध आहे असे मत देताच वरील पंजाबी गाऱ्हाणे खरे आहे असे मानून वाद्येच नव्हेत तर मूर्तींच्या मिरवणुकीच- आणि मशिदीसमोर नव्हे तर मुसलमानांच्या दुकानासमोर, शेजारी पुढे, मागे, वर, खाली, बंद ठेवणे हेच एकीच्या दृष्टीने हितावह आहे. 'वाद्यांच्या विषयीच नव्हे तर मूर्तीपूजा सोडून देण्याविषयीही आपल्या परम प्रिय मुसलमान बंधूंच्या भावना हिंदू विचार घेतील'- असा ठराव पुढील राष्ट्रीय सभा संमत करील अशी आम्ही उत्कृष्ट आशा करितो.

वाद्यबंदीची मागणी राष्ट्रीय सभेने विचारात घेतलीच आहे. आता ह्या वर्षी मूर्तीपूजा बंदीची मागणी तिने विचारात घेऊन मान्य करावी की, पुढील वर्षी मुंजबंदीची मागणी, मुंज ही मुसलमान धर्माविरूद्ध आहे ह्याच सर्वमान्य आणि राष्ट्रीय सभा-संमत तत्वाचे आधारावर पुढे करता येईल. असे एक एक करून आपण हिंदुमुसलमानांत दुही माजविण्याचे सर्व प्रश्न हळूहळू सोडवून हिंदूंना मुसलमानच करून टाकू आणि राष्ट्रीय हित साधल्याचे महत्तम पुण्य शीघ्रच गाठी बांधू शकू.

खरे पाहिले असता वाद्यांपेक्षा किंवा मूर्तीपेक्षा मुसलमानांनी या मुंजीचाच समाचार आधी घेतला पाहिजे. कारण त्यांच्या तबलीगचा भयंकर शत्रू कोणी 'वाद्ये' किंवा 'मूर्ती' नसून एक 'मुंज'च आहे.

कोणचीही गोष्ट चांगली वा वाईट हे मुसलमानी धर्मात ती आहे की नाही ह्यावरून हिंदूंनी ठरवावे ही मुसलमानांची मागणी अगदी स्वाभाविक आहे. पण हा आर्यसमाज जिथे तिथे त्यास आडवा येतो आणि आता हे संघटन : गंडस्योपरि पिटिका संवृत्ता!

मुसलमानांनी स्वाभाविकपणेच म्हटले, सत्यार्थप्रकाश जप्त करा. कारण त्यांत मुसलमानांच्या काही मतांचा निषेध आहे. लगेच आर्य समाज आणि संघटनावादी ओरडून उठले, कुराण जप्त करा! कारण त्यात हिंदू धर्माविरूद्ध पुष्कळ गोष्टी आहेत! कोण ही खोडसाळ प्रवृत्ति या संघटनांची! अशा बरोबरीने का राष्ट्रीय एकी साधते!

म्हणून आम्हांस 'मूर्तीपूजा बंद करा!' ह्या मुसलमानांच्या नव्या मागणीस काही तरी अपशकुन हे संघटनावादी करतील अशी भीती वाटत आहे! हो, कोणी सांगावे मुसलमान एडिटरांनी 'आमच्या धर्मात मूर्तीपूजा निषिद्ध आहे, म्हणून वाद्येंच तर काय पण आमच्या दुकानावरून मूर्तीची मिरवणूकच बंद करा' म्हणून तार देताच, एखादा आर्य समाजी एडिटरही तार द्यावयाचा की, 'प्रेते पुरणे' हे हिंदूधर्मात निषिद्ध आहे. म्हणून प्रेते पुरलेल्या आईबापाच्या पोटचा कोणचाही सुपूत्र वा कुपूत्र आमच्या दुकानावरून जाता कामा नये!' मुसलमानी एडिटरांस तार करता येते आणि हिंदू एडिटरांस, 'नाही' असे थोडेच आहे!

सिन्धमध्ये तालुका डोकरी येथील कोण्या सय्यद मुसलमानाच्या मुलीने 'कुराण' ग्रंथाशीच आपला निकाह-लग्न लाविले! अष्टपुत्रा सौभाग्यवती भव!

ह्या 'अष्टपुत्रा' वरून आम्हांस छापखान्यातील भुतांची भीती वाटू लागते आहे. मागे एकदा 'अष्टपुत्रा' हा शब्द नीट वाचता न आल्याने किंवा वाचता यावा असा नीट लिहिला न गेल्याने, तो एका बुद्धिमान उपमुद्रिते (प्रुफस) पहाणाऱ्याने 'उष्ट्रपुत्रा' असा छापला होता! तशी एखादी चुकी ह्या वरील आशिर्वादाच्या छापण्यात होऊ नये म्हणून ही चेतावणी देत आहो.

अद्भूत लग्नाची सध्या नाही तरी साथच येऊ पाहत आहे. 'कुराणा'ची लग्ने अशी होऊ लागल्याचे पाहाताच 'पुराणा'सही स्वस्थ बसवेना. त्यानेही दोन-चार ठिकाणी चांगलाच हात मारला आहे.

कारण एवढ्यात अनेक युरोपियन मुलींनी हिंदुधर्म स्वीकारून हिंदूंशी लग्ने लावल्याचे वृत्त येत आहे. ग्रुवेन हाफ नावाच्या २३ वर्षाच्या जर्मन मुलीने स्वा. सत्यनंदजींच्या हस्ते हिंदुधर्म ग्रहण केला आणि श्री किरणचंद्र बागची यांच्याशी विवाह केला. कुमारीचे नाव इंदूबाला असे ठेवण्यात आले आहे. विवाहानंतर पेढे वाटण्यात आले आणि उपस्थित असलेल्या अनेक हिंदूनी ते खाल्ले हे सांगितलेच पाहिजे. श्रीमती रिबिट्रस नामक इंग्रजी बाईनेही हिंदूधर्म स्वीकारला आहे. आपल्या पतीच्या स्मृत्यर्थ ती काशीला एक मंदिर बांधविणार आहे. शर्मिष्ठा देवींची गोष्ट तर त्रिखंडात माहीत आहे.

युरोपियन मुलींशी हिंदूंची लग्ने होणे हे काही नवीन नाही ती पूर्वीही होतच होती हे अमेरिकेपासून रशियापर्यंत पसरलेल्या प्रत्येक राजधानीतील हिंदी वसतीत डोकावताच दिसून येईल. पण आजपर्यंत हिंदूंचे युरोपियन मुलींशी लग्न लागताच मुलगी घरी येण्याचे स्थली मुलगाच घरास पारखा होऊन ख्रिश्चन होई आणि मुलगीच्या घरी जाई. आता तसे न होता युरोपियन मुलीच हिंदू होऊन आमच्या मुलांच्या घरी नांदण्यास येत आहेत. पूर्वी बायबलामागे हिंदू मुले धावत आता

आमच्या ‘पुराणा’मागे नवीनांतील ‘नवीन’ ख्रिस्ती मुली धावत आहेत. म्हणतात ना दोन दिवस सासूचे, दोन दिवस सूनेचे! चाललेच आहे! चांगलेच आहे.

***

सध्या हिंदूस्थानातील इंग्रजी थोर पुरूषांच्या पुतळ्यावर साडेसाती आल्यासारखेच दिसते. पंजाबातील लॉरेन्सचा पुतळा हलविण्यासाठी प्रथमतः स्त्रीपुरूष मुलांसह सर्व लाहोर नगराने तिथे जमावे- नुसते जमावे, म्हणून गांधीजींनी त्यांच्या शेकडो सत्याच्या प्रयोगांपैकी एक प्रयोग करतांना आज्ञा सोडली होती. पण पुतळा हलविण्यापेक्षाही उभे लाहोर हलविणे अर्थातच जड गेले. इतक्यात कोणाच्या डोक्यात काय कल्पना घुसली ईश्वर जाणे- त्याने रातोरात जाऊन त्या पुतळ्याच्या हातातील तलवारच मोडून टाकली. सरकारने लगेच त्या पुतळ्यावर लाजेचा पडदा सोडला. वादविषयक उर्मटपणाची वाक्ये त्या पुतळ्यावरून खोडून टाकली. आणि ते प्रकरण विझले. सगळे लाहोर हलून जे साधावयाचे होते ते एक मनुष्य हलून साधले गेले. पुढे नीलच्या पुतळ्यावरून मद्रासला राग आला. पण तिथे दगडी पुतळ्यास घण किंवा दगड मारणे- दगडास दगड मारणे! -ही हिंसा की अहिंसा हा अत्यंत गंभीर प्रश्न उत्पन्न होऊन, शेवटी चिखल मारण्यास हरकत नाही असे ठरले आणि त्या चिखलातच तो प्रश्न अजून रुतून बसलेला आहे.

तोच-

तोच इकडे मुंबईची तार आली की, मुंबईच्या व्हिक्टोरिया राणीच्या पुतळ्याच्या हातातील राजदंड मोडून त्यास कोणी तरी मनुष्याने विद्रुप केलेले आहे!

एकाएकी राजदंडालाच हात घातला ह्या मुंबईच्या माणसाने! लाहोरसारखे काही मबईची मुंबई हलवून स्त्रिया पुरूष मुलांसह तिथे जाण्याचा बेत केला नाही की, अहिंसेच्या चिखलात मढू गोळे वळीत बसला नाही. विक्षिप्त कुठला! नसती कुलंगडी उपस्थित करण्यास मिळते तरी काय ह्या लोकांना?

अशा अचंब्यात शहाणे लोक चिंतातुर झालेले आहेत. तोच डोके असलेल्या पोलिसांस तो पुतळा विद्रुप कसा झाला ह्याची कल्पना आली आणि त्याने प्रसिद्ध केले की, ‘पुतळ्याच्या हातातील तो राजदंड रस्ते धुवणाऱ्या नोकराच्या पाण्याच्या बंबातील फवाऱ्यासरशी निसटून पडला. अगदी सहज अपघाताची गोष्ट दुसरे काही नाही’. तथास्तु! दुसरे काही नसले म्हणजे सगळ्यांसच बरे.

कारण मागेही एकदा ह्याच पुतळ्याची हालअपेष्टा झालेली होती किंबहुना इंग्रजीत पुतळ्यांची अशी संभावना करण्याचा बूट, प्रथम ह्या पुतळ्यास जे पंचवीस तीस वर्षांमागे विद्रुप करण्यात आले होते, तेव्हापासूनच, हिंदूस्थानात निघाला आहे.

महाराणी व्हिक्टोरियाच्या उत्सवाचा तो दुसरा दिवस होता. अगदी अचूक त्याच दिवशी ह्या त्या विख्यात राणीच्या पुतळ्यास पहारा चूकवून कोणा धाडसी मनुष्याने त्या उत्सवाच्या गुलाबी रंगाचा बेरंग करण्यासाठी डांबराचा रंग फासून त्याचे गळ्यात पादत्राणांची फाटकी माळ घातली होती! पुढे तो डांबराचा रंग काढून पुतळा नीट करावयास हजारो रुपये व्यय करावे लागले. ज्या धाडसी मनुष्याने हे कृत्य केले त्याचे नांव पुढे सर्वतोमुखी झाले. पुण्यात प्लेगचे दिवसांत रँड साहेबास मारणाऱ्या चाफेकर बंधूंनीच ह्या पुतळ्याची ही विटंबना केली होती असे मागून सिद्ध झाले.

ह्या मागच्या इतिहासानेच ह्या पुतळ्यास पुन्हा विद्रुप केल्याच्या बातमीस थोडेसे महत्व आलेले आहे. नाही तर कोण विचारतो, दगडी पुतळ्यांच्या हातातील राजदंडास!

पण पाण्याच्या फवाऱ्याने तो राजदंड निसटून पडला, हे सोपे आणि उभय पक्षांसही सोयीस्कर असे स्पष्टीकरण तत्काळ झाल्याने बरे झाले.

पण तो राजदंड पडला तर सापडला कसा नाही? पाण्याच्या फवाऱ्याबरोबर जो उडाला तो अजूनही वर उडतच चालला आहे? आणि तो नोकर पळून गेला म्हणतात तो का आणि दुसऱ्या हातातील 'भूगोल' **(Orb)** विच्छिन्न झाल्याचे ते छापले आहे तो गोळाही पाण्यानेच भंगला की काय?

पण हे प्रश्न दुय्यम आहेत. त्याचे समाधानकारक उत्तर केव्हाही देता येईल. आता सावधानता इतकी ठेवली पाहिजे की, हा राजदंड पाण्याच्या फवाऱ्यासरशी उडाला या स्पष्टीकरणाचे अगदी दृढीकरण करीत राहिले पाहिजे आणि ह्यापुढे प्रसंगी पाण्याच्या फवाऱ्यासरशी वाहून जातील असे कच्चे राजदंड हाती न देता त्या पुतळ्याच्या हाती पक्के राजदंड दिले जावेत. कारण पुतळ्यांचे हातातील का होईना, पण राजदंड गळून पडावेत हे भोळसट लोकांस अशुभ चिन्हसे वाटते म्हणून जपावयाचे, दुसरे काय?

-दि. २४ मे १९२८

(११)

## संपूर्ण राजकीय स्वातंत्र्य ह्या शब्दांनी चिडलेले गांधीजी नि इंग्रज

राष्ट्रीय सभेने हिंदुस्थानाचे ध्येय ‘संपूर्ण राजकीय स्वातंत्र्य’ हेच होय, स्वराज्य शब्दाचा हाच खरा अर्थ होय, असे गेल्या डिसेंबर महिन्यात मद्रासला घोषित केले.

त्या वेळेस त्या ‘स्वातंत्र्याच्या’ ठरावाचा दोघा जणांस फार तिटकारा आला. दोघेजण त्या ठरावाला ‘पोरकट’, अशक्य, वेडगळ’, म्हणून अगदी चिडल्यासारखे झाले. ते दोघेजण म्हणजे एक इंग्रज आणि दुसरा-दुसरा-दुसरा आमचे गांधीजी!!!

हिंदुस्थानने ‘पूर्ण स्वातंत्र्य’ हेच राजकीय ध्येय ठरवावे याचा राग त्या दोघांपैकी इंग्रजाला यावा हे साहजिकच आहे, अशा वेळी असे होतेच.

उदाहरणार्थ, परवाच मुंबईतील एका न्यायाधीशाने एका धंदेवाईक चोराविरूद्ध जेव्हा निकाल दिला की, त्याच्यापाशी धरलेली सर्व मत्ता ज्या सावाला लुबाडून त्याने घेतली होती त्या सावास देऊन टाकावी. तेव्हा त्या चोरीचा प्रामाणिकपणे व्यवसाय करणाऱ्या त्या चोरासही साहजिकच असाच राग आला! ते म्हणाला देखील की, निढळाच्या घामाने मी ही मत्ता मिळविली होती. चोर लोकांच्या थोरवीचे गौरवार्थ जे म्हणतात अगदी तेच वर्णन माझ्या प्रयत्नालाही लागू आहे. त्या सावाची मत्ता काही माझ्या उशाशी कोणी आणून ठेविली नव्हती; तर सातव्या मजल्यावर तो साव निजला असता मी आपल्या बाहूबलाने त्या भयंकर उच्चतेवर चढून गेलो.

**The height that I too reached and kept!**
**Was not attained by a sudden fight!!**
**But I while honest men had slept!**
**Was toiling upwards in the night!!!**

जर त्या चोरास तसा राग येणे साहजिकच होते,तर इंग्रजासही स्वातंत्र्याच्या ठरावाचा राग येणे साहजिकच नव्हे काय? तेही सहजच म्हणतात की, ‘आमच्या बापजाद्यांनी हे हिंदी साम्राज्य निढळाच्या घामाने मिळविले आहे, सातारचे, झाशीचे , लाहोरचे, पुण्याचे, अयोध्येचे-एक का दोन! इतके मुकुट, सिंहासने, रत्ने, माणके, रुपये-अहो नुसते उचलून कोठारात भरावयाचे असते तरी भीमासारखा हमाल देखील थकला असता! मग आम्ही तर ती सर्व उचल आमच्या बाहूबलाने प्रथम लुटून मग उचलून घेतली आहे! इतकेच नव्हे तर या राजकीय लुटीला आणि उचलीला आता आम्ही साम्राज्य हे नांव देखील देऊन चुकलो आहोत. लुटीला ‘साम्राज्य’ म्हणून म्हटल्यानंतर देखील का ती ज्याची त्याला परत मिळण्याचा अधिकार उरतो! पण आता चार पिढ्या लोटल्यानंतर त्या साम्राज्यावर तुम्ही तुमचा अधिकार सांगता! केवढा अन्याय! आम्ही आपले लक्ष देत नाही म्हणून, नाही तर १२१ चा आकडा माहीत आहे का? तो १२१ चा आकडा! असला तर सरळ, नाही तर काळाच्या गळयासारखा वाकडा! हे विसरू नका!’

स्वातंत्र्याच्या ठरावाची अशी अगदी चीड ज्या दोघांना-इंग्रजाला आणि गांधीना- आली त्यांपैकी इंग्रजाला चीड येणे साहजिकच आहे, हे बहुतेकांस समजतच असेल. पण महात्मा गांधींना-हिंदुस्थानच्या पोटी आलेल्या, या एका वर्षात स्वराज्य मिळवू निघालेल्या महान देशभक्तास,

हिंदुस्थानने इंग्रजांच्या पारतंत्रास झुगारून देण्याचा निश्चय करताच एवढी चीड का याची याचे पुष्कळांस कोडे पडले आहे. त्यांच्या भक्तांस देखील ते कोडे उलगडत नाही. त्यापैकी दोघे तिघेजण परवा आजूबाजूस कोणी नाही असे पाहून आपसांत कुजबुजत होते 'हे कसे काय की बुवा? स्वातंत्र्य हा सर्व राष्ट्रांचा, व्यक्तींचा, जसा जीवन तसा निसर्गसिद्ध अधिकार आहे. इंग्रजी सत्तेस सैतानी म्हणणाऱ्या या न्यायपरायण गांधीजींना स्वातंत्र्याचा ठराव आवडू नये हे कसे! हे त्यांच्या पूर्वचरित्रास अगदी विसंगत दिसते खरे!'

परंतु या कोड्याची किल्ली या पूर्वचरित्रातच सापडणार आहे हे त्यांच्या या सहा-सात वर्षांच्या आतच झालेल्या परिचित मंडळीस ठाऊक नाही. म्हणून तर त्यांची ही फसगत झाली आहे. गांधीजींचे पूर्व चरित्रच नव्हे तर प्रस्तुत चरित्रही या विसंगततेच्या सूत्राने अगदी सुसंगतपणे ग्रंथिलेले आहे आणि तेही त्यांनी स्वतःच! आपल्या आत्मचरित्रात ते काय म्हणतात पहा!

झुलू लोकांशी इंग्लिशांची कटकट चालू झाली. झुलूनी हिंदुस्थानचे काही एक घोडे मारले नव्हते. इंग्लिशांचे देखील त्यांनी काय बुडविले होते हेही गांधीजीस कळत नव्हते. किंबहुना त्या झुलूच्या रानटी स्वातंत्र्यास हिरावून त्यास ब्रिटिशांच्या नखांचा धाक बसविण्यासाठी इंग्रजांनीच खाजवून खरूज काढिली असे सर्व जगाला कळत होते! पण इंग्रजांनी झुलूवर स्वारी केली. इंग्रज हिंदुस्थानचे राजे, गांधी हिंदुस्थानेच एक सुपूत्र-अर्थात ते इंग्रजांची प्रजा; तेव्हा इंग्रजांनी स्वारी केली तर गांधीना त्या आपल्या आवडत्या साम्राज्यांच्या आज्ञेस पाळण्याचा प्रजाधर्म साभांळलाच पाहिजे! ते त्या स्वारीबरोबर इंग्रजांचे वतीने स्वयंसेवक होऊन गेले. झुलूंना पशूहून क्रौर्याने इंग्रज मारीत चालले हे ते पाहत होते. झुलूचे स्वातंत्र्य इंग्रज हरण करीत आहेत हे ढळढळीत दिसत होते. पण दयार्द्र गांधीजींनी झुलविरूद्ध इंग्रजी सैन्यात स्वयंसेवा करण्याच्या कार्याचे त्यागपत्र दिले नाही! इंग्रजी राज्याविषयी त्यांचे मनात जी कळकळ वाटे, तिला झुलूंच्या कत्तलींनी दयेचा पाझर फुटेना. हा सत्याचा एक प्रयोग झाला.

बोअर युद्धाची गोष्ट तर बोलावयासच नको. त्या शूर राष्ट्राचे स्वातंत्र्य हरण करण्यास निघालेल्या इंग्रजी सैन्यात हे हिंदुस्थानचे सुपुत्र, स्वतःचे स्वातंत्र्य गमावून बसलेले प्रामाणिक आणि उपजत दास स्वयंसेवक बनून बळे बळे इंग्रजी सैन्यात शिरले! एक दोघे नव्हत तर आणखी पाच पन्नास लोकांस एकत्र करून! उभे जगत् बोअरांच्या स्वातंत्र्य युद्धातील पराजयाने हळहळले आणि इंग्रजांच्या विजयाला धिक्कारू लागले. पण बोअरांच्या स्वातंत्र्याची हत्या करण्याचा पवित्र कार्यात ज्याचे हात लाल रंगले होते त्यांस इंग्रजांनी पारितोषिके वाटली, तेव्हा गांधीजीनाही एक मिळाले आणि पदक-तो प्रामाणिक आणि लोचट दास्याचा पट्टा त्यांनी अभिमानाने आपल्या गळ्यात घालून घेतला. हा झाला दुसरा प्रयोग.

तरी पण हे स्वतःचे स्वातंत्र्य बुडवून मग दुसऱ्याचे स्वातंत्र्य, त्या स्वतःचे स्वातंत्र्य बुडविणाऱ्या तिसऱ्याचेसाठी, तुडवीत जगभर हिंडत फिरणारे 'सत्याचे प्रयोग' तिकडे सुदूर आफ्रिकेत चालले होते. प्रत्यक्ष हिंदुस्थानास त्या सत्याची लस टोचावयाची उरली होती. तेव्हा परमकारुणिकपणे सत्याचा तोही प्रयोग प्रत्यक्ष हिंदुस्थानातच करावा म्हणून गेल्या महायुद्धाचे वेळी इंग्रजांच्या साम्राज्यास- म्हणजेच हिंदुस्थानच्या पारतंत्र्यास-प्रामाणिक लतकोडगेपणाने आपली निष्ठा

विकलेल्या या अप्रामाणिक मूर्खतेचे प्रदर्शन हिदुस्थानातही चालू झाले. त्या महायुद्धाचे सुवर्ण संधीस लोकमान्यांच राष्ट्रीय पक्ष शक्य तितके हिंदी अधिकार इंग्रजांचे हातुन हिसकावण्यासाठी इकडे पटांगणात बुद्धिबळाचे डावपेच खेळत होता, तर तिकडे तो अभिनव भारतीय क्रांतिपक्ष सर्व अधिकारांचे अधिष्ठान असलेला राजदंडच इंग्रजांचे हातून छिनावून घेण्यासाठी प्राण पणास लावून 'शक्तीने मिळती राज्ये' म्हणून गर्जत, बैठे डाव उधळून देऊन, रणांगणात घुसत होता; त्याच वेळेस गांधीजी आपल्या 'सत्याचे प्रयोगात' अथवा आत्मवृत्तात लिहितात की, 'त्या वेळेस या जर्मन युद्धात माझे कर्तव्य काय आहे हा प्रश्न माझ्या समोर उभा राहिला..... कित्येक हिंदी लोक म्हणत त्याप्रमाणे इंग्रज आपले बलात्कारी धनी, आपण दास, त्यांचा आमचा हा संबंध असल्याने त्यांच्यावरील संकटाचा उपयोग आपण आपल्या मुक्तीकडे करावा हा उपदेश माझ्या गळ्यात तेव्हा कसा उतरू शकणार होता! कारण मला माझी स्थिती अगदी दासासारखी वाटतच नव्हती. माझी धारण ही की, दोष इंग्रजी राज्यपद्धतीत आहे आणि अधिकतः इंग्रजी अधिकाऱ्यांत आहेत. हे दोष आम्ही प्रेमाने दूर करू शकू. राज्यपद्धती सदोष वाटे; पण ती आज जशी असह्य वाटते तशी तेव्हा वाटत नसे. परंतु आज या पद्धतीवरचा माझा विश्वास जितका उडाला आहे तितकाच ज्यांचा त्या वेळेसच उडाला होता, ते त्या संकटात इंग्रजांच्या हातून शक्य ते अधिकार छिनावण्याच्या मार्गास लागले. ते इंग्रजांस साह्य कसले देणार? पण मला अधिकार छिनण्याचे, तर बाजूसच राहो पण अधिकार मागण्याचेही धोरण अशा इंग्लंडवरील संकटाचे वेळी असभ्य आणि अदूरदृष्टीचे वाटले. आणि इंग्रजास उलट बिनअट साह्य देणे हे आपले श्रेष्ठ कर्तव्य होय असे मी निश्चित केले'. 'या दूरदृष्टीच्या आणि सभ्य कर्तव्याचे पूर्तीसाठी' गांधीजींनी प्रथम ८० एक लोक जमवून त्या युद्धात स्वयंसेवा करण्याची परवानगी मिळविण्यासाठी अर्जावर अर्ज करण्यास आरंभ केला. पण शेवटी कुशाग्रबुद्धी इंग्रजी राजकारणांस त्या कोट्यावधी लोकांच्या धुमाळीत ह्या मूठभर बापड्याची स्वयंसेवा दर्यामें खसखस वाटून त्यांचा उपयोग त्यापेक्षा हिंदुस्थानातील लोकमान्यांच्या राष्ट्रीय पक्षाचे डावपेच हाणून पाडण्यात अधिक होईल असे तत्काल दिसून येऊन या 'दीर्घ' आणि 'सभ्य' इंग्रजी राजनिष्ठांस हिंदुस्थानाकडेच त्यांनी वल्हवीत आणिले. अहिंसात्मक सभ्य सत्याने पुढे इकडे मांडलेले थेर प्रसिद्धच आहेत. जर्मनांस सशस्त्र युद्धात ठार मारण्यासाठी हिंदुस्थानातल्या बिचाऱ्या शेतकरी लोकंस सेनेच्या कत्तलखान्यात धाडण्यास हीच अहिंसा इंग्रजांची 'स्वयंसेवक रिक्रुटिंग ऑफिसर' झाली होती! जुने नीतीशास्त्रच कधी कधी लिहितात 'धर्मासाठी केलेली हिंसा हिंसाच नसते. सज्जनांचे रक्षणार्थ करावी लागणारी हिंसा अहिंसाच असते'. जुनी व्याख्या चुकीची आहे, निरपवाद अहिंसाच खरी अहिंसा असे म्हणणारे महंत त्या निरपवाद अहिंसेची सक्रिय व्याख्या अशी करितातसे दिसते की, इंग्रजांच्या साम्राज्यासाठी जी हिंसा ती हिंसाच नव्हे! जर्मन, झुलू, बोअर वाटेल तो जो इंग्रजांच्या साम्राज्याविरूद्ध लढत असेल, त्याची हिंसा करण्यासाठी 'रंगरूट' भरती करण्याच्या निरपवाद अहिंसेच्या 'सभ्य' कार्यक्रमात हिंसा संमत आहे!

गेल्या महायुद्धात गांधीजींनी राष्ट्रीय पक्षाच्या अडवणुकीच्या राजकारणास शक्य तो खो घालण्यास झटून त्या थोडे यश मिळविले. लोकमान्यांचे कार्यातच ते थोडाबहूत खो घालू शकतील

इतकीच इंग्रजांची अपेक्षा होती. कारण क्रांतिकारक महात्माजींच्या अहिंसात्मक 'सभ्य' 'दूरदृष्टीस' कवडीच्याही उधारीने विचारीत नाहीत हे सरकार जाणूनच होते.

गांधीजीच्या आत्मचरित्रातील वरील उताऱ्यावरून त्यांनी मद्रासच्या राष्ट्रीय सभेने संमत केलेल्या स्वातंत्र्याच्या ठरावाने चिडून जावे हे किती साहजिक आहे हे कोणासही समजून येईल. त्यांचे पूर्ववृत्त आणि 'पहाडी चुक्यां'ची परंपरा ज्यांस माहीत नाही, त्यांसच त्याचे आश्चर्य वाटेल तर वाटो.

गेल्या महायुद्धात त्यांस ती 'सभ्य' अहिंसात्मक 'दूरदृष्टीची' धोरणे आणि तत्त्वे वाटली, ती त्यांनी त्याच उताऱ्यात आज मला तशी वाटत नाहीत म्हणून म्हटले आहे. म्हणजे त्या वेळेस जे लोक त्यांस त्यांची धोरणे आणि वृत्ति चुकीची आहे म्हणून म्हणत, तेच बरोबर होते हे त्यांनी मान्य केले आहे त्या लोकांस जे वीस-पंचवीस वर्षापूर्वी स्पष्ट दिसले ते गांधीजींच्या 'दूरदृष्टीस' आज अंधुकपणे दिसत आहे. इतकी त्याची राजकारणी 'दूरदृष्टी' अदूरदर्शी असते!  त्यांच्या जुन्या 'सत्याचे अनंत प्रयोगांत' जर कोणचे एखादे सत्य सिद्ध झाले असेल, तर ते हेच होय की त्यांना सत्य म्हणून जे जे वाटले ते ते बहुशः असत्य असते. प्रयोग करण्यास लागणारी चिकित्सक दृष्टी आणि वृत्ति त्यांच्यात वसतच नाही आज जे 'सत्य' म्हणून ते मानतात, त्यासच उद्या एक 'पहाडी चूक' म्हणून तेच संबोधितात. कालचे त्रिकालाबाधित सत्य आज 'पहाडी चूक' होते, आजचे सत्य उद्या पहाडी चूक होते-उद्याचे सत्य परवा पहाडी चूक ठरते-परवाचे तेरवा असा हा क्रम अव्याहत चालू आहे.

या परंपरेने पाहिले असता मद्रासच्या स्वातंत्र्याच्या ठरावास पोरकट आणि अदूरदर्शी म्हणून आज जे गांधी म्हणतात, तेच उद्या त्यांच्या या उद्गारांसच 'पोरकट' म्हणून ही एक **Himalayan mistake** होती म्हणून ठरविण्यास बहुशः पुढे येतील- पण ते आणखी काही वर्षे उलटल्यावर! जे जगाला आज दिसते ते त्यांना दहा-वीस वर्षांनी दिसते! दूरदृष्टि! दूर गेल्यावर मागचे दिसणारी दृष्टि!

पण हजार वेळा अनुभवास आलेली ही गोष्ट आज पुनः एकदा सांगण्याचे कंटाळवाणे कर्तव्य करून टाकण्याचे मुख्य कारण हे की, त्यांच्या काही अनुयायांस स्वातंत्र्याच्या ठरावाला त्यांनी केलेला विरोध पाहून अजूनही बिचकल्यासारखे, बावरल्यासारखे होत आहे, ते न व्हावे. ज्याला ज्या सत्याची माहिती झालेली नाही, तो त्या विषयातील अज्ञ मनुष्य त्या सत्याचे प्रयोग करीत बसतो हे ठीकच; पण स्वातंत्र्य हे राष्ट्राचे, व्यक्तीचे जसे जीवन, तशी उपजत, पूर्वर्जित, अहरणीय मत्ता आहे हे राजकीय सत्य ज्यांना सूर्यासारखे ढळढळीतपणे दिसत आहे, त्यांनी याविषयी आणखी प्रयोग ते काय करायचे!  पंचवीस वर्षापूर्वी जी राजकीय सत्ये अभिनव भारतास दिसली, ती आज गांधीजींना दिसत आहेत! त्यात त्यांचा इतकासा दोष नाही. परंतु राजकारणात काय किंवा धर्मकारणात काय, पण त्यांची दूरदृष्टि इतकी अदूरदर्शी असते, प्रत्यही त्यांच्या हातून त्यांनाच उद्या तिरस्कारणीय वाटणाऱ्या घोडचुका घडतात, हे त्यांच्या आत्मवृत्तातील सत्याच्या प्रयोगशाळेत पदोपदी उघडकीस येत असता पुनः त्यांच्या त्या अंधतमसावृत्ता दृष्टिलाच आपली

राष्ट्रीय प्रगतीच्या मार्गातील यष्टि करू पाहणाऱ्या भोळ्या लोकांचाच हा दोष होय. अंध नेत्याचा जितका दोष तितकाच अंधेनैव नियमानांचाही असतोच.

पण सुदैवाने आणि अशा वारंवार केलेल्या निर्भीड दोषाविष्करणानेच आज त्या दोषाच्या रोगापासून हे हिंदी राष्ट्र बहूतेक मुक्त होत चालले आहे ही आनंदाची गोष्ट आहे. हिंदुस्थानचे ध्येय पूर्ण स्वातंत्र्यच! हे महात्माजींना जरी आणि इंग्रजांना जरी आवडले नाही, तरी त्यांपैकी पहिल्याच्या निर्जीव शापांची किंवा दुसऱ्यांच्या मारक चापांची चिंता न करता उभे भारत त्या स्वतंत्र्यता-भगवतीच्या चरणावरच आपली अढळ निष्ठा अर्पण करावयास येत आहे! ती केरळ प्रांतीय परिषद आणि तिचे अध्यक्ष पं. जवाहरलाल नेहरू यांचे भाषण पहा. ती कर्नाटक परिषद आणि तिचे अध्यक्ष नरिमन यांचे भाषण पहा. ती महाराष्ट्र परिषद आणि तिचे अध्यक्ष सुभाष बाबूंचे भाषण पहा. जिकडे तिकडे स्वातंत्र्य लक्ष्मीचा जयजयकार चालला आहे! स्वातंत्र्यलक्ष्मीच्या नगाऱ्याचीच घाई तेथे इंग्रजी साम्राज्यावरील लतकोडग्या निष्ठे! तुझ्या टिमकीचे काई!

स्वातंत्र्यलक्ष्मीच्या जयानादाने मागेही एकदा या भारतभूमीच्या देवालयाचा हा सभामंडप नसला, तरी तिचा तो गाभारा, असाच दुमदुमून गेलेला होता! जी गर्जना- अभिनव भारताची गर्जना-गाभाऱ्यातून निघून आज सभामंडप दुमदुमवीत आहे. उत्तम! पण -पण....

पण अजून एक मोठा फरक उरला आहे. एक मोठीच उणीव भरून काढावयाची आहे! तुम्ही सर्वांनी 'स्वातंत्र्य' हेच ध्येय म्हणून ठराव केलेत. साध्य ठरविलेत पण हे महाराष्ट्र-कर्नाटक-केरळ-वंगा! - हे भारता, नुसता साध्याचा ठराव केलास! पण साधनाचे नाव देखील तेथे कोणी का बरे काढिले नाही?

स्वतंत्र्यता लक्ष्मीच्या पूजेची साधने तिच्या गाभाऱ्यात जोवर जमली नाहीत, कोणी ती जमविण्याचा चकार शब्द काढिला नाही, तोवर नुसत्या सभामंडपात तिच्या चालणाऱ्या या पारोशा आणि रिकाम्या जयघोषांनी तिचा उत्सव साजरा कसा होणार! पूजेवाचून, होमावाचून ती देवी कशी प्रसन्न होणार?

म्हणून सावधान! साधनाचा एकही ठराव झाला नाही- म्हणून सावधान! नाही तर पुन्हा भलतेच साधन भलताच मनुष्य योजू लागेल, ती लतकोडगी अहिंसा, ते परधार्जिणे प्रेम, तो स्वपक्षघातकी-न्यायपक्षघातकी-निःपक्षपात-ज्यांनी ज्यांनी गेल्या महायुद्धात सभ्यतेच्या आणि न्यायाच्या सोंगाखाली अन्यायापुढे धूप जाळले, ते ते सर्व आज उद्यांच्या एखाद्या नव्या सुवर्णसंधीत पुनः तसलीच खुळे उभारण्यास कमी करणार नाहीत. म्हणून तर त्यांची ही सारखी झडती घ्यावयाची! आणि चेतावणी द्यावयाची की-

साध्याचा ठराव झाला पण साधनाचे काय ते बोला? कारण मुख्य गोम ती तेथेच आहे!

नाही म्हणवयास एका पंजाबने मात्र साधनाचे अंधुक दिग्दर्शन केले. 'पूर्ण स्वातंत्र्य हेच आमचे ध्येय आणि त्यास जे प्राप्त करून देण्यास शक्य होईल ते आमचे साधन!

संकल्प ठीक सुटला देवालयाच्या सभामंडपात इतके झाले तरी पुरे आहे. पण आता त्या गाभाऱ्यात चला. मुख्य पूजेचे साहित्य तेथे हवे पण तेथे अजून एकही फूल, एकही समिधा, हुताशनाची एकही पेटलेली ठिणगी दिसत नाही!

(१२)

# हुतात्मा अंदमानांत मेले का नाहीत?

काही दिवसांपूर्वी आम्हांस एकाने सांगितले की, हिंदुसंघटनांवर सदोदित शिव्याशापांची वृष्टि करून आपल्या हिंदुत्वाचे सार्थक करणाऱ्या, डॉ. मुंजे-केळकर यांच्या संघटन चळवळी देशद्रोही आहेत म्हणून समजणाऱ्या, सिंध प्रांत मुसलमानांस आंदण देऊन टाकावा म्हणून तरवारलेल्या, कोणाएका कानपूरच्या वीरपुरूषाने 'श्रद्धानंदा'च्या संपादकास, स्वातंत्र्याच्या ठरावास विरोध केला म्हणून 'श्रद्धानंदा'ने त्या विरोधकास केलेल्या टीकेने चिडून, विचारले आहे की, 'हुतात्मा' म्हणविणारांनी क्षमा कशी मागितली- ते तुरूंगात मरणी मरून का गेले नाहीत? नव्हे त्यांनी सरकारला अर्ज तरी का केले?

वास्तविक पाहता 'श्रद्धानंद'च्या संपादाकाने बंदिगृहातून सुटण्यासाठी सरकारास अर्जबिर्ज कधीही केले नाहीत- मग क्षमेची गोष्ट तर दूरच. म्हणून आम्हांस प्रथम वाटले की, 'श्रद्धांनदा'च्या संपादकाच्या नावांचा इतर कोण्यातरी थोर हुतात्म्याच्या नावांशी घोटाळा होऊन आपली ही चूक झाली आहे असे तया कानपूरच्या वीरपुरूषास कळवावे.

परंतु पुनः वाटेल की, ज्या अर्थी त्याने अगदी हुतात्मा असे स्पष्ट लिहून त्यांस क्षमा का मागितली म्हणन हाडसून विचारिले आहे, त्या अर्थी ही अगदी चूकच नसावी. हुतात्मा म्हणून देशात ज्यांस आज गौरविले जाते त्यांच्यात कोणीही क्षमा मागितल्याचे आम्हास माहीत नाही. हा एक गोष्ट मात्र प्रसिद्धच आहे की, पंजाबपासून पांदेचरीपर्यंत आणि सिंधपासून बंगालपर्यंत शेकडो क्रांतिकारक-की ज्यांनी आपले शिर आपल्या हातात घेऊन आणि घरच्या संसारास आग लावून स्वदेशाच्या संसारास थाटण्यासाठी राष्ट्रस्वातंत्र्यलक्ष्मीच्या जयजयकारात मृत्यूच्या खिंडीत 'मारिता मारिता' प्रवेश केला आणि त्या रणधुमाळीत आहत  होऊन पाडाव केला आणि वर्षानुवर्षे भयंकर छळ सोशिल्यावर पुनः देशसेवा करता यावी म्हणून थोडे दिवस झुंज सोडण्याची विपक्षाची अट मान्य करून त्यांचे हातून मुक्तता करून घेतली, त्यांसच हुतात्मे म्हणून संबोधिले असेल- आणि त्यांच्या या अटीसच जर क्षमायाचना म्हटले असेल तर?

तर काय? असल्या हुतात्म्यांस की, ज्यांच्या साहसाच्या, स्वार्थत्यागाच्या आणि व्रतनिष्ठेच्या पराक्रमाने शत्रूंनी देखील दिपून जावे-त्यांस ललकारीत तू कारागारात मरून का गेला नाहीस? म्हणून हटकणारा एवढा वीर पुरूष असावा तरी कोण-आणि असले वीर कानपूरला जिवंत असता तेथून दोन हातांवर असलेला ब्रिटिश कमांडर-इन-चीफ अजून जशाचा तसा राहिला तरी कसा याचे आम्हांस सभय आश्चर्य वाटून आम्ही क्षणभर संतभित होऊन राहिलो!

शिवाजीला देखील शत्रूच्या हातात पडला असता तुरुंगात 'मरणी मरूण जाण्याचे' हे आत्महत्यारी शौर्य करवले नाही. त्याने अर्जांची भेंडोळी तर किती धाडिली असतील याची गणतीच नाही. त्याने औरंगजेबाच्या पायाशी विनम्र विनंती केली, त्याने औरंगजेबाच्या हातावर तुरी दिल्या आणि त्याने औरंगजेबाच्या छातीवर हिंदुपदपादशाहीच्या सिंहासनाचा पाय दिला! पण तो भित्रा दिल्लीच्या त्या कारागारात अन्न सोडून सत्याग्रह करीत मरणी मेला नाही. त्यास ते धाडसाच झाले नाही.

औरंगजेब जे साधू शकला नाही, ते स्वतः मरून त्यास साधून देण्याचे शहाणपण शिवाजीत कुठले? अफजुलखाना पुढे तर तो हात जोडून गेला- ज्या हातांत वाघनखे होती ते हात जोडून! त्या कपटाचा अधिक धिक्कार करावा की त्या हात जोडणाऱ्या भ्याडपणाचा हेच समजत नाही! अहिंसेची कंकणे हाती भरून, सत्याच्या नावांने आपल्या सेना कुठे कशा दबलेल्या आहेत ती सर्व ठावठिकाणे अफजुलखानाला सांगत अफजुलखानाच्या मार्गात आडवे पडून उपास करीत त्याने सत्याग्रह का केला नाही, असं शिवाजीसही पुन्हा हटकले जाते की काय म्हणून आम्हांस शंकाविव्हळ भय वाटू लागले की, शिवाजीने डोक्यावर गांधी टोपी घातली असती, तर किती बरे होते- शौर्याची ही अपूर्व क्लृप्ती आणि धृति सुचविणारी अचाट बुद्धिमत्ता त्या टोपीत उबलेल्या डोक्यावाचून कोणा इतर डोक्यात उपजणार आहे? कारण शिवाजीला आणि प्रतापाला मी त्यांचे काळात असतो, तर हिंसात्मक सशस्त्र क्रांतिविषयी दोषीच ठरविले असते, असे जर्मनांस इंग्रजासाठी मारणाऱ्या अहिंसेने अलीकडेच प्रसिद्धपणे सांगितलेच होते! 'यंग इंडिया'चे वाचकांस हे माहीत असलेच पाहिजे.

पण भूतकाळाच्या कोठारात दडून बसल्यामुळे शिवाजी जरी सुटला तरी आजकाल स्वातंत्र्ययुद्धातील पुरस्कार वीरपक्षाचा मान ज्या क्रांतिकारकास मिळाला आहे, त्या पथकांत ज्याला **Morning Star of Indian Independence** म्हणून सरोजिनींनी गौरवावे, आणि **the Prince of Indian revolutionists** म्हणून शत्रूनीही संबोधावे त्या 'हुतात्मा'पासून तो कालच्या काकोरीच्या देशवीर रामप्रसाद बिसमिल, संन्यालादिक मारणाऱ्या, फाशीवरी मेलेल्या किंवा जिवंत फाशीवर - जन्मठेपेवर - लटकत असणाऱ्या क्रांतिकारक हुतात्म्यांपर्यंत सर्वांनीच सरकारास अर्ज केले आहेत. फाशी रद्द करा म्हणून इंग्रजांच्या राजास दयेचे अर्ज देखील. सत्येंद्रापासून तो काकोरीच्या रामप्रसादादिक हुतात्म्यांपर्यंत सर्वांनी केले आहेत. पण त्यांस आजवर हे अर्ज करण्यापेक्षा मरणी मरून का जात नाही म्हणून विचारणा कोणी शहाणा भेटला नाही. पण आज त्या **'Prince of Indian revolutionist** ला देखील तसे हटकणारा मनुष्य कानपूरास उत्पन्न झाला आहे हे कळताच, तो मनुष्यपुंगव असेल तरी कोण, दिसेल तरी कसा, त्याने असे अद्‌वितीय पराक्रम तरी कोणकोणते केले आहेत, या प्रश्नांनी सभय आश्‍चर्य वाटत आम्ही क्षणमात्र स्तंभित होऊन राहिलो!

वाटले की, 'को एष सम्प्रति नवःपुरुषावतारो, वीरो न यस्य भगवान् भृगुनंदनोऽपि!'

तोच कलकत्त्याच्या प्रसिद्ध 'स्वतंत्र' दैनिकाच्या ४ ऑगस्टच्या अंकात बातमी वाचली की, कानपूरच्या 'प्रताप' नावाच्या पत्राचे गणेश शंकर विद्‌यार्थी नामक कोणी संपादक आहेत. त्यांनी सरकारी कोर्टाची मानहानी करण्याच्या अभियोगातून आपली सुटका करून घ्यावी म्हणून सपशेल क्षमा मागितली. नुसते दुःखदर्शन करून मुख्य न्यायाधीश सोडीना तेव्हा '**Unconditional apology**' बिनअट क्षमा मागून, सरकारी कोर्टाच्या दयेवर आपणांस सोडवून घेऊन, 'क्षमस्व' म्हणून, सरकारची त्रिवार याचना केली -आणि सरकारचा सर्व व्यय भरून देऊन आपली सुटका करून घेतली!

ही बातमी वाचताच तत्काल आम्हांस वाटले की होय रे होय 'हुतात्म्यांस' अर्ज करून बंदीतून का सुटलेत, मरणी मेला का नाहीत, म्हणून हटकणारा तो 'नवः पुरुषावतारः' तो कानपूरचा

मनुष्यपुंगव हा ‘प्रताप’चा संपादकच असला पाहिजे! पुंगवच तो! आपली शिंगे आणि ‘केसरी’ ची नखाग्रे यातील भेद अनुभवावाचून त्यास कसा कळणार!

कारण हुतात्म्यास मेला का नाहीस म्हणून म्हणण्याचे धाडस असल्या कोणातरी ‘क्षुद्रात्म्या’सच व्हावयाचे! **Fools rush where angels fear to tread-**

स्वदेशस्वातंत्र्यार्थ झुंजताना शत्रूचे फासात गळा अडकून प्राणावरच बेतली असता, त्याचे कार्यात पुनः झुंजता यावे म्हणून शत्रूच्या हातून निसटण्यासाठी एखाद्या काकोरीच्या क्रांतिकारकाने इंग्रजांच्या राजास दयेची याचना करण्याचे पत्र टाकिले, तर त्यास हसण्याचे साहस तोच मनुष्यपुंगव करू शकेल की, जो प्राणांची तर गोष्टच दूर, पण एखादे दुसरे वर्ष बंदीत पाडण्याचा क्षुद्र प्रसंगही येताच -राजाविरूद्ध सशस्त्र युद्ध पुकारण्याच्या भंयकर आरोपाच्या भीषण दंडाची गोष्ट दूरच, पण एका सरकारी न्यायालयाचा अपमान करणारा एक यःकश्चिंत् लेख लिहिल्याचा आरोप येताच -गडबडून जाऊन विपक्षाचे पाय चाटू लागतो!

तरीही हे ‘प्रताप’ संपादक! ‘हुतात्म्या’कडे ज्या मत्सराच्या उलट्या दुर्बिणीतून पाहण्याचे धाडस तुम्ही केलेत, त्याच दुर्बिणीने तुम्हाकडे पाहिले असता तुम्ही किती आणि कसे ‘क्षुद्रात्मे’ दिसता हे तूम्हांस दाखविण्यापुरताच हा त्या दुर्बिणीचा उपयोग दुःखाने पण निरुपायाने आम्ही केला आहे.

आणि म्हणूनच तुमचा निरोप घेण्याचे आधी आता ती तुमची भुक्कड मत्सराने तडकलेली दुर्बिण बाजूस फेकून देऊन आपणांस सांगतो की, आपण कोर्टाच्या क्षमायाचनेत जे केलेत ती नीती त्या परिस्थितत क्वचित ठीकही असू शकेल. त्या थोर हुतात्म्यांचाच आदर्श आपण पुढे ठेविलात, तर आपण आढळून येईल की, ‘कातर्यं केवला नीतिः शौर्यं श्वापदचेष्टितम। अतस्तपःसमेताभ्या -मुभाभ्यामन्वितयेष सः!’

त्यातही नैनीतालच्या कारागृहातील बंदीवर अत्याचार होत असल्याविषयीच्या ज्या आरोपांची चौकशी न्यायालयात चालली आहे, त्याविषयी आपण जे लिहिलेत ते लिहिण्यात आपला हेतु जनतेची दुःखे निवारण करण्याचाच होता आणि अशा प्रकारे पूर्वीही काही वेळा आपल्या ‘प्रताप’पत्राने त्रयस्थ जनतेची सेवा भूषणावह रितीने केलेली आहे हेही येथेच सांगणे आम्ही आमचे कर्तव्य समजतो. कारण आम्हांशी इतरांनी अनुकूल आणि प्रतिकूल अशा दोन्ही बाजू विचारांत घेऊन जसे न्याय्य बुद्धिने वागावे असे आम्हांस वाटते, तसेच आम्हीही इतरांशी वागण्याचा शक्य तो प्रयत्न करीत असतो.

महात्माजींसंबंधाने जे आपण लिहिलेत त्याचा समाचार पुढे एखादे वेळी घेऊ आणि तोही तेव्हा की जेव्हा गांधीजीसच त्याविषयी जर आणि जेव्हा काही विचारावेसे वाटेल तर आणि तेव्हा. महात्मा गांधीस आम्ही जाणतो आणि ते आम्हांस जाणतात. आमचे आम्ही आजपर्यंत पाहत आलो आहोत. पुढेही पाहून घेऊ. कोणा गोमा गणेशास त्यात तोंड खुपसण्याची योग्यता नाही. अहिंसेस लतकोडगी म्हणणे आणि गांधीजींसच तसे म्हणणे या दोन भिन्न गोष्टी आहेत, इतके कळण्याचेही ज्ञान ज्यास नाही त्याच्याशी बोला ते काय? महात्माजींस उत्तर देऊ पण पुढे. आज तो थोर देशभक्त बार्डोलीच्या रणांगणात ज्या धोरणाने लढत आहे ते धोरण अजून कुशल सेनापतीस योग्यच असल्याने आणि कोणच्याही राष्ट्रीय लढ्यात शक्यतो आपण सर्वांनी खांद्यास खांदा लावून

एकजात लढणे युक्त असल्याने या वेळी आम्ही महात्माजींच्या सहकारितेस आणि साहृयास उपयोगी पडतील तेच शब्द बोलू आणि तेच आचरण करू इच्छितो आणि राष्ट्रीय हिताचाच अगदी घात होतो तेथेच काय ते आडवे येणे प्राप्त होते तेही राष्ट्रकार्यापुरतेच. व्यक्तीशः 'परैस्तु विग्रहे प्राप्ते वयं पंचशताधिकम्' हेच आमचे सर्वांचे ब्रीदवाक्य असले पाहिजे; आमचे आहे गोमागणेशास आता तरी हे कळेल काय?

-दि. ३ ऑगस्ट १९२८

## (१३)

# राष्ट्रीय सभेपेक्षा सर्वपक्षीय सभा मोठी!

पं. मोतीलाल नेहरू म्हणतात की, ‘सर्वपक्षीय सभेस मी राष्ट्रीय सभेपेक्षाही अधिक महत्वाची समजतो.’ एका अर्थी हे खरे आहे. कारण सर्वपक्षीय सभाच खरी राष्ट्रीय सभा-राष्ट्राच्या प्रतिनिधित्वाचे पूर्ण प्रतिबिंब पडलेली सभा होय. क्रांतिकारक राष्ट्रीय सभेच्या जुन्या याचकशाहीच्या किंवा नव्या खादीशाहीच्या आज्ञांस राष्ट्रीय आज्ञा म्हणून मानीत नसत. तेव्हा ते याच कारणाचा उच्चार करीत. सर्वपक्षीय परिषद ही एका अर्थी राष्ट्रीय सभेहून राष्ट्राची खरी प्रतिनिधिक संस्था होय; तिचा ठराव प्रागतिक नसला तरी प्रातिनिधिक आहे खरा.

परंतु तो ठराव नेहरूंना कधी, कुठे, केव्हा ऐकू आला? आम्हांस तर ठराव झाल्याचीच नव्हे पण सर्वपक्षीय परिषद भरल्याची देखील बातमी नाही- शक्यता देखील दिसत नाही. कारण हिंदुस्थानाच्या अभ्युदयासाठी या सर्व पक्षांमध्ये हातघाईने आणि प्राणपणास लावून लढणारा जो क्रांतिकारक पक्ष, त्याला कोणत्याही परिषदेत आमंत्रण आल्याचे आमंत्रण दिल्याचे, त्यांचे पक्षीय अस्तित्वही मानल्याचे आमच्या ऐकिवात नाही आणि जर कधी क्रांतिकारक पक्ष अशा ‘सर्वपक्षीय’ म्हणविणाऱ्या परिषदेत, त्या नावांतील अर्थातच आमंत्रण समजून मंडपाच्या पुढच्या दाराने आत शिरला, तर हे प्रागतिक, जागतिक, अगतिक इत्यादी सर्व पक्ष त्या मंडपाच्या मागच्या दाराने-सुरतेला ज्या दाराने मेथाप्रमुख गृहस्थ नाहीसे झाले त्याच दाराने-वाट काढून अदृश्य होतील हे उघडच आहे.

क्रांतिकारकांचे नाव तर दूरच; पण राष्ट्रीय सभेत पं. जवाहरलालचा स्वातंत्र्यपक्ष देखील खपत नाहीसा, झेपत नाहीसा झाला आहे. तरी बरे, बिचारा जवाहरलालांचा ‘स्वातंत्र्यसंघ’ही स्वातंत्र्याच्या साधनांचे नाव देखील घेत नाही. ‘काय हवे’ तेवढेच काय ते ठरविणाऱ्या वादविवादांच्या दुंदुभि वाजविण्यात ते ‘कसे घ्यावयाचे’ ह्या विचाराचा उच्चार देखील स्वतःचा स्वतःसही ऐकू येता कामा नये-ही जी पुरातन परंपरा सर्व राष्ट्रीयपक्ष विपक्षांनी आजवर प्रामाणिकपणे पाळली, तिचा ह्या नवीनातील नवीन ‘स्वातंत्र्य संघाने’ ही मुळीच उच्छेद केलेला नाही. आम्हांस अधिकार हवेत, मवाळ म्हणाले, आम्हांस स्वराज्य हवे, जहाल म्हणाले; आम्हांस स्वातंत्र्य हवे, जवाहलाल म्हणाले; पण ते आम्ही कसे घेणार हे सांगण्यातच नव्हे तर योजण्याचा देखील दूरदर्शीपणा त्यांतील कोणीही केला नाही! स्वातंत्र्य हवे! पण ते कसे मिळवावयाचे ह्याचा आचार किंवा विचार करण्यास आम्ही कोणी ‘माथेफिरू’ आहोत किंवा काय? स्वातंत्र्याची साधने जुळविणे हे एका चुटकीचे काम! असे-जसे-तसे-कसे तरी- वाटेल तेव्हा पाहता येईल! माथेफिरू माणसावाचून, त्या साधनांची खटपट करण्याइतका कोण उतावळा किंवा रिकामटेकडा आहे! माथे असलेल्यांनी स्वातंत्र्य की स्वराज्य या शब्दाच्या उच्चारा-प्रत्युच्चारांच्या धुमाळीत राष्ट्रीयसभेचा आठवडा गाजविला की संपले.

तथापि वैदिक क्रियेचे आधी वैदिक मंत्राचे उच्चार बरोबर करणे हेही जसे आवश्यक असते, तसेच ध्येयाचा उच्चार तरी आता बरोबर ‘वर्णस्थान-समीरित’ असा लोकांस करता येऊ लागला.

याविषयी तरुण पं. जवाहलालांचे आणि वृद्ध पंडित आयंगारांचे आभारच मानिले पाहिजेत. गुप्त यज्ञागारातील यज्ञाग्नीतून अविर्भूत झालेला तो महामंत्र त्यांनी राष्ट्रीय सभेच्या सिंहासनावर आणून बसविला.

पण त्यामुळे राष्ट्रीय सभेच्या सिंहासनावर जी परधार्जिणी अवदसा आजवर बसलेली होती, तिचा भयाने आणि त्रासाने जळफळाट होऊ लागावा हे सहजच होते. यास्तवच आणखी एक-दोन वर्षे राष्ट्रीय सभेच्या सिंहासनावर या अवदसेची झेप  न पडेल अशी सावधगिरी ठेविली पाहिजे. स्वातंत्र्याचा महामंत्र राष्ट्रीयसभेच्या ध्वजावर, राष्ट्रीयसभेच्या सिंहासनावर, राष्ट्रीय हृदयाचे वेदीवर सारखा उद्‌घोषित होत राहिला पाहिजे! 'ना तरी सटवी ती परवशता। करील निश्चित घाता' ही गोविंदाची सावधानता आपण विसरता कामा नये.

तरुण जवाहरलाल स्वातंत्र्याचा दीक्षित झाला ह्यात आश्‍चर्य नाही. पण श्रीमान् आयंगारांसारखा वृद्ध 'ऋषिः पुराणो' या पदवीस त्याच्या या ध्येयनिष्ठन पात्र व्हावा हे आश्‍चर्य!

कोणी संशयतात की, आयंगार पूर्वी सरकारचे ॲडव्होकेट जनरल होते! असतील! पूर्वी राष्ट्रीय सभेचे पुढारी देशभक्तीच्या जिन्याने चढत राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षपदाच्या पायरीवरून सरकारचे परवशतेच्या हायकोर्ट जज्जाच्या जागेवर पाय ठेवीत. आज आयंगार त्या सरकारच्या परवशतेच्या पायरीवरून उतरून राष्ट्रीय स्वातंत्र्याचा झेंडा उचलीत आहेत. आधी राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होऊन मग हायकोर्ट जज्जशिपची जागा पटकाविणाऱ्या परंपरेपेक्षा आधी ॲडव्होकेट जनरल असताही त्या पाशातून सुटून मग स्वातंत्र्याच्या दिव्य ध्येयाकडे चढत जाणाऱ्या आयंगारांची ही परंपरा पुष्कळच अधिक अनुकरणीय आहे.

आयंगरांनी स्वातंत्र्याच्या ध्येयाचा हट्ट धरला, तर कोणी म्हणतात राष्ट्रीय सभेत बेकी होईल! नेहरू-प्रतिवृत्तास संमती सुखाने द्यावी. ती संमती स्वातंत्र्यवाद्यांनी तात्पुरती तोड म्हणून देणेच योग्य. परंतु म्हणून कोणी मद्रासच्या राष्ट्रीय सभेत संमत झालेल्या स्वातंत्र्याच्या ध्येयाचा ध्वज खाली ओढू लागेल तर बेकीच्या बुजगावण्यास न भिता राष्ट्रातील सर्व तरुणांनी श्रीमान् स्वातंत्र्यवादी आयंगारांचे नेतृत्वाखाली झुंजून ती आपत्ती टाळली पाहिजे. एकी राष्ट्रीय हिताकरिता हवी. राष्ट्रीय विमोचनाकरिता हवी- राष्ट्र इंग्लंडच्या साम्राज्याच्या रथाच्या चाकाशी नित्याचे बांधून टाकण्यासाठी नको!

पन्नास आळशांशी एकी व्हावी म्हणून स्वतःही अधोगामी रिकामटेकडेपणा करीत बसण्यापेक्षा बेकी करून राष्ट्रीय उद्धारासाठी निरलस मेहनत करणे बरें. दहा भ्याडांशी एकीच्यासाठी संगनमत करून स्वतःही भ्याड होण्यापेक्षा एकट्याने त्या सगळ्यांशी बेकी करून राष्ट्रसाठी जो साधेल तो पराक्रम करण्यास बेछूट निघून जाणे चांगले. कोटी कोटी लोकांबरोबर 'माझी मातृभूमी इंग्लंडच्या साम्राज्याची शिक्का मारलेली बटीकच राहणार' म्हणून एकीसाठी सांगण्यापेक्षा त्या सर्व बुद्धिभ्रष्ट जगाशी साफ बेकी करून एकटा एकाकी गर्जत राहणे बरे की नाही? ही माझी मातृभूमी कोणाची बटिका-नावालासुद्धा राहणार नाही! दुसऱ्याचा शिक्का तिच्या राजमुद्रेवर तिला सहन होणार नाही! ती स्वतंत्र होऊ इच्छिते! नहीतर झुंजत मरू इच्छिते!! मला तरी तिचा हाच संदेश मिळाला आहे!

पूर्वी सुरतेला ह्याच एकीच्या बुरख्याखाली 'स्वराज्या'च्या ठरावाची गळेचेपी होणार होती. पण टिळकांनी, राष्ट्रघात करते ती एकी खरी बेकी होय, असे म्हणून राष्ट्रहितकारक बेकीच पत्करली आणि 'स्वराज्या'चा ध्वज पडू दिला नाही. त्याप्रमाणे स्वराज्य, म्हणजे इंग्लंडच्या कक्षेतील एक उपग्रहाचे परावलंबी अस्तित्व, बिनसैन्यी, बिनविमानी, बिनजलसेनी, बिनराजमुकुटी, असे पंगु संस्थानी अस्तित्व-अशी व्याख्या जेव्हा होत आहे, तेव्हा हजार नव्हे लाख लाख लोक जरी त्या भ्रमात सापडले आणि एकीसाठी तूही असाच भित्रा भ्रमिष्टपणा स्वीकार म्हणून सांगू लागले, तरी त्यातून तात्काल फुटून निघून स्वातंत्र्याच्या ध्येयाचा ध्वज उचलून धरण्यासाठी आपले एकट्याचे हातांनी तरी आपले शिर तुटून पडेतो झटले पाहिजे. अशा परिस्थितीत एकी हेच पाप, बेकी हेच पुण्य.

मुसलमानांची एकी व्हावी म्हणून खिलाफतीची आफत उरावर बसवून घेणाऱ्या सज्जनांनीच आजही ह्याच एकीच्या नावांवर स्वातंत्र्याविरूद्ध कोल्हेकुई चालविला आहे. राष्ट्रीय सभेत परावलंबित्वाचे लागलेले हे ग्रहण मद्रासला सुटले होते ते पुन्हा लागू नये म्हणून कलकत्त्यास सर्व स्वातंत्र्यवाद्यांनी श्री आयंगारादि पुढाऱ्यांस पाठिंबा दिला पाहिजे.

आंयगर म्हणजे नेहरूंचे पुढारीपण हिसकावून घेण्याकरिता स्वातंत्र्याचा जयजयकार करीत आहेत! पण त्यात बिघडावयाचे ते काय? गोखल-मेथांचे पुढारीपण न साहवल्यामुळे टिळक स्वदेशी बहिष्काराचा उदो उदो करीत होते म्हणून किंवदंती ओरड असेच की नाही! पण राष्ट्रहित त्यानेच साधले म्हणून टिळकांकडेच पुढारीपण जाणे योग्य ठरले. तीच स्थिती आजची. जर मोतीलाल नेहरू स्वातंत्र्याचे ठरावास हाणून पाडू म्हणतील- बहुधा ते तसे करणार नाहीत- ते किंवा आणखी कोणी इंग्रजांच्या ऋणानुबंधाने मिंधी झालेली माणसे तसे करू लागतील, तर स्वातंत्र्याचे नावांने त्यांच पुढारीपण आयंगारांनी हिसकावून घेण्याचा प्रयत्न करणे हेच योग्य आहे. पुढारीपण घेऊ पाहणारास, ते पुढारीपण जाऊ नये, म्हणून झटणाऱ्यांना तरी काही दोष देता येणार नाही!

-दि. १३ डिसेंबर १९२८

## (१४)

# लालाजींवर लाठीमार

देशवीर लाला लजपतरायतीस शस्त्रसंन्यस्त स्थितीत गाठून, हीन,दीन दुबळ्या अशा स्वदेश बांधवांच्या दुःखाचा परिहार करण्याचा यत्न केल्याच्या पापासाठी इंग्रजांच्या उन्मत लाठ्यांनी घायाळ केले.

परंतु लालाजींस मारहाण करूनच ते थांबले असते तर त्यांच्या ख्रिस्ती धर्माच्या पुस्तकातील वाक्यांचे अर्धेच अनुसरण झाले असते. ख्रिस्ती धर्माच्या धर्मग्रंथातील भविष्य तंतोतंत खरे ठरविण्याचे पुण्य त्यांना लागले नसतेस. जे **Prophets of Old** बोलले ते खरे व्हावे म्हणून लालाजींना मारहाण केल्यानंतर इंग्रजांनी एक कमेटी नेमिली. आपण कोणीच अशी मारहाण केली नाही असे म्हणत ते लालाजींस विचारू लागले-तुम्हास कोणी मारले ते तुम्हीच सांगा पाहू? बघू बरं तुम्ही ओळखता का? पाहू खरे तुम्हांला तेवढी तरी बुद्धि आणि धैर्य आहे की नाही?

‘**For all this came to pass as foretold**.’ कारण हे सर्व त्यांच्या धर्मपुस्तकात, बायबलात ग्रंथित केले असेच घडून आले. त्या ख्रिस्ती अधिकाऱ्यांचा बायबलवर विश्वास होता. त्या शिकवणीचे, त्या इतिहासाचे अक्षरन् अक्षर आचरून दाखविणे येशूच्या भक्तांचे कर्तव्यच होते.

म्हणून ‘बॉइड कमिटी’ नेमली.

कारण बायबलात त्यांच्या या कृत्याचे जे भविष्य आधीच तंतोतंत वर्तविलेले आहे त्यात स्पष्टच म्हटले आहे की, **They then spat at him in his face and did buffet him. They smote him in the face with the palms of their hands and jeeringly asked; prophesy unto us, oh Christ, who of us smote thee!**

या यमकाने सायमनप्रसंगीच्या मारपिटीचे आणि बॉइड कमिटीचे ते भविष्य किती बरोबर वर्णिले आह! बायबल खरोखर भविष्यवादी ग्रंथ आहे. इंग्रज सरकार खरोखर ख्रिस्तीच आहे आणि वरील भविष्य परवाच्या घटनेचेच असल्यामुळे वरील बायबलातील वाक्यात संबोधलेला खाअस्ट शब्द लालाजीस संबोधूनच लावला आहे. कारण बॉइड कमिटीने त्याच वाक्यात विचारले आहे. **Prophesy unto us, oh Lalaji, who of us smote thee!!**

-दि. २० डिसेंबर १९२८

(१५)

# काशीतील दोन संमेलने

# माकडा महासंमेलन नि भाकड महासंमेलन

काशी येथे गेल्या दोन महिन्यापूर्वी जी दोन महासंमेलने एकाच वेळी भरली त्यांची विस्तृत माहिती आता वाचकांना कळलेलीच आहे.

त्यांपैकी ज्ञानवापीजवळ भरलेले पहिले महासंमेलन म्हणजे मर्कट महासंमेलन होय आणि दुसरे महासंमेलन म्हणजे अज्ञानवापीजवळ भरलेले ब्राम्हण महासंमेलन होय. तेच जरा प्राकृत भाषेत सोयीस्कर रीतीने सांगावयाचे तर पहिल्यास माकड महासंमेलन आणि दुसऱ्यास भाकड महासंमेलन म्हटले असताही चालेल.

माकड महासंमेलनाची माहिती काशीच्या पत्रांतून जी आली ती सारांशरूपाने अशी आहे की, काशीला काही दिवसांपासून विजेच्या तारा मार्गातून लावण्यात आल्या. त्यापूर्वी असलेल्या साध्या तारांवर, मग त्या कुंपणाच्या असोत, जाळीच्या असोत, काशीची माकड मंडळी पूर्वापार बसत आलेली असत. तारांवर बसणे, वेळी त्यास धरून लोंबकळणे हा माकडांचा जातिस्वभावच होऊन बसला होता. त्यायोगे त्यांस कोणतीही हानी होत नसल्याने ते कृत्य, ती रूढि त्यांच्या ज्ञाति-स्मृतीत शिष्टाचार म्हणून आजपर्यंत गणलेली असे. विजेच्या तारा जेव्हा नवीन आल्या, तेव्हा 'त्या तारांसही त्यातील विजेचे नावीन्य माहीत नसल्याने माकडे त्या आपल्या शिष्टसंमत रूढीप्रमाणे लोंबकळू लागली परंतु विजेचे चटके बसून त्यांची एकाएकी फारच धांदल उडाली. प्रथमप्रथम हे अपघात का होतात हे त्यांच्या मुळीच ध्यानात येईना. ती अगदी गोंधळून गेली. शेवटी या अतर्क्य संकटाची काही चिकित्सा करावी आणि सर्वानुमते त्यावर काही तोड काढावी म्हणून त्या काशीच्या माकडांनी त्यांच्या जातीचे एक महासंमेलन भरविले. शेकडो माकडे एका मैदानावर एकत्र झाली. त्यांच्यात किती वेळा तरी माकडी भाषेत गिचमिच चालून शेवटी काय ठरले कोणास ठाऊक; पण त्यांतील एक वृद्ध माकड उड्या मारीत बाहेर पडला. समस्त सभा त्याचेकडे टक लावून पाहत राहिली. तो हळूच त्या नवीन तारांच्या खांबावर चढला. मग हळूहळू हात पुढे करीत त्याने त्या खांबावरून त्या तारांस झटझट बोटे लावण्याचा प्रयत्न केला. अर्थातच त्यास काही चटके बसले. तत्काल खांबावरून उतरला. परत आपल्या ज्ञातिसंमेलनात आला. पुन्हा थोडी गिचमिच झाली आणि त्या दिवसांपासून सर्व माकडांनी तशा प्रकारच्या तारांवर चढणे एकाएकी सोडून दिले. हे वृत्त आम्ही गमतीचे म्हणून कल्पितपणे देत नसून ही गोष्ट खरोखरच अशी घडली हे वृत्त वर्तमानपत्रे वाचणारांस माहीत आहेच.

वर दिलेली घटना जशी दिसली तशी स्थूल रुपाने वर्तमानपत्रांनी प्रसिद्ध केल्याप्रमाणे आम्ही वाचल्यानंतर त्या माकडांच्या सभेतील सूक्ष्म हेतूही कळावा म्हणून आमचे विशिष्ट वार्ताहर श्री मनकवडे यास आम्ही तिकडे धाडले होते. त्यांनी माकडांच्या मनात शिरून त्या सभेविषयी काही अधिक माहिती जी धाडली तीही येथे देत आहो. अर्थात् तिला वाचकांनी कल्पित म्हटल्यास आमचा

प्रत्यवाय नाही कारण श्री मनकवड्याप्रमाणे मनातले जाणण्याची शक्ती सर्वांसच असते असे नाही ते लिहितातः आजपर्यंत निरुपद्रवी असणाऱ्या तारांवर हे अपघात का व्हावे हे न समजल्या मुळे माकडांनी ते महासंमेलन भरविले होते. त्यात कोणी हनुमान नावाच्या माकडाने सुचविले की, क्वचित ह्या तारांत काही हानिकारक पदार्थ भरलेला असावा. ह्या तारा आजपर्यंतच्या तारांहून निराळ्या असाव्या. हे त्या माकडाचे बोलणे ऐकताच त्यांतील एक पुच्छवान-नावाचा दुसरा माकड रागावून म्हणाला, ‘छट्! भलतीच शंका. तारांमध्ये अशा भयंकर तारा असू शकतात असे शक्य असते, तर आपल्या त्रिकालदर्शी स्मृतिकारांनी ते पूर्वीच सांगून टाकले नसते की काय?तार पाहिली की चढावे, लोंबकाळावे हा आपला ज्ञातिनियम आज हजारो वर्षे आपण अबाधित पाळत आलो. पण असे अपघात कधी झाले नाहीत. तेव्हा तारांवरची ही शंका व्यर्थ आहे. हा आपल्या त्रिकालदर्शी पूर्वजंचा अपमान आहे! हा त्या रागावलेल्या माकडाचा आक्षेप ऐकताच त्यातील एक वृद्ध शीर्षवान् नावाचा माकड म्हणाला, ‘आपल्या या आक्षेपकाचे नाव त्यांच्या आईबापांनी ‘पुच्छवान्’ म्हणून जे ठेवले ते योग्य आहे यात काही शंका नाही.’ शीर्षाने विचार करण्याचे सोडून हा शेपटाने विचार करतो हे त्यांच्या ह्या मूर्खपणाच्या आक्षेपावरूनच उघड आहे याचे उत्तमांग मस्तक नसून पुच्छ आहे! अरे वेड्या, तूच म्हणतोस, पाहतोस की, आजवर न झालेले नवीन अपघात आज घडत आहेत, तेव्हा ज्या अर्थी त्रिकालदर्शी पूर्वजांनी स्मृतीत न सांगितलेल्या आणि आजवर आपल्या जातीत ठाऊन नसलेल्या नवीन अपघातांस आपणास भोगावे लागत आहे, त्याअर्थी ते अपघात मानणे हा देखील त्या स्मृतीकारांचा अपमानच आहे की काय? आणि नवीन अपघात जर मानतोस तर त्याची नवी चिकित्सा ठरविणे हाही जुन्या स्मृतीचा अपमान नाही हेही तुला मानलेच पाहिजे. ते काही नाही. या तारा इतर तारांहून नवीन आणि अधिक भयंकर आहेत की काय हे एकदा अजमावून पाहिलेच पाहिजे. मी पुढे होतो. आणि ह्या नव्या तारांतच त्या अपघाताचे कारण आहे की काय हे तुमच्यासमक्ष बघून येतो. समाजाचे कल्याणासाठी मला त्यापायी चटके बसले किंवा धक्का बसून मृत्यू आला तरी चिंता नाही!’ हे त्या शीर्षवान माकडाचे बोलणे ऐकताच सर्व सभेने त्याची वाहवा केली. आणि त्यास त्या कार्यावर धाडले. त्याने वरच्या बातमीत सांगितल्याप्रमाणे त्या तारांवर प्रयोग करून ठरविले की, त्या तारा नवीन असून त्यात कोणचे तरी भयंकर दाहक द्रव असल्यामुळे त्यांना स्पर्श न करण्याची नवीन रूढि माकडांनी पाडल्यावाचून अपघातापासून त्यांचे रक्षण होणार नाही. हे मत त्याने परत येऊन सभेत सांगितले. ‘परिस्थिती बदलली आहे. आता तारा तितक्या निर्दोष समजण्याच्या जुन्या रूढीत बदल करून अशा तारांना शत्रूवत् लेखण्याचा नवा नियम आपल्या स्मृतीत घातला पाहिजे!’

‘परिस्थिती बदलली आहे!’ हे त्या शीर्षवानाचे शब्द ऐकताच तो पुच्छवान माकड रागाने म्हणाला, ‘भलतेच! परिस्थिती हा शब्दच शास्त्रबाह्य आहे! परिस्थिती काय, ती बदलली की काय याचा विचार करणे माकडधर्माविरूद्ध आहे!’ हे त्याचे बोलणे ऐकताच सर्व माकडे खो खो हसले आणि म्हणाले ‘परिस्थितीचा पालट विचारात न घेण्याचे ब्रीद बाळगण्यास आपण कोणी काशीचे राजेश्वर शास्त्री आहोत की काय! अहो, ह्या पुच्छवानास काही समजतच नाही! मनुष्य कुठला!’ असा

धिक्कारध्वनी उठलाच तो पुच्छवानही विरमला आणि सर्व माकडांनी त्या नवीन तारांस न शिवण्याचा नवीन नियम करून बदलेल्या परिस्थितीस तोंड दिले.

हे माकड महासंमेलन इकडे चालले असतानाच तिकडे काशीच्या निवडक ब्राम्हणांचे भाकड-महासंमेलन चालले होते. हिंदुस्थानातील अनेक ब्राम्हण तेथे एकत्र झाले होते. त्यांनी केलेले ठराव म्हणून आता सर्वत्र प्रसिद्ध झालेलेच आहेत. माकड महासंमेलनात पुच्छवान माकडाची असंमत झालेली धिक्कृत सूचना या भाकड-महासंमेलनात संमत झाली. त्यात एक शीर्षवानचा अनुयायी जेव्हा म्हणाला,"परिस्थिती बदलली आहे! तिला तोंड देएयास आपण समर्थ होऊ असा शास्त्रार्थ हवा. केवलं शास्त्रमाश्रित्य न कर्तव्यो विनिर्णयः। युक्तीहीनविचारे तु शास्त्रहानिः प्रजातये।।"-

-तेव्हा तो स्मृतीश्लोक ऐकू येऊ नये म्हणून त्या ब्राम्हण महासंमेलनात सर्वांनी एकच गिल्ला करून सांगितले की, 'छट्! परिस्थिती हा शब्दच शास्त्रबाह्य आहे! 'परिस्थिती', 'पालट', 'विचार' याचा विचार देखील आम्हांस विचारात घेता येत नाही! असे शुद्ध संस्कृत भाषेत ओरडत त्या प्राकृतांनी असा ठराव केला की, परिस्थितीचा पालट विचारात घेणे हे पाखंड आहे. माकडांपेक्षा त्या मनुष्यांच्या सभेतच पुच्छवानाच्या अनुयायांची फार मोठी संख्या आहे हे अशा प्रकारे दिसून आले.

परंतु या ब्राम्हण महासंमेलनातील ठरावामुळे डार्विनच्या विकासवादाला मोठाच धक्का बसला. परिस्थितीचा पालट विचारात घेऊन त्याप्रमाणे ज्या जाती आणि ज्या व्यक्ती आपापले व्यवहार पालटतात, त्याप्रमाणे त्या जगतात आणि विकसित होतात. त्या विकासवादाच्या **(Evolution)** व्याख्येनुरुप डार्विन आदिकांनी माकडाची उन्नती होत होत मनुष्य झाला म्हणून सिद्ध केले. परंतु काशीच्या माकड महासंमेलनातील आणि भाकड-महासंमेलनातील हे ताजे वृत्त ऐकून विकासवादाच्या व्याख्येप्रमाणे मनुष्य हे माकडाचे विकसित रुप आहे ह्या आपल्या सिद्धांतास अपवाद आहेत असे विकासवाद्यांना कळू लागणे साहजिकच आहे. कारण माकडे परिस्थितीच्या पालटास वर्तनाचे पालट करून तोंड देतात आणि मनुष्यातच परिस्थिती विचारात न घेणारे प्राणी निपजतात. अर्थात निदान काशीच्या भाकड-महासंमेलनातील पंडित हे तरी माकडांची विकसित श्रेणी नसून माकडे हीच त्या पंडितांची विकास पावून श्रेष्ठत्वास गेलेली रुपे होत असे मानणे प्राप्त होत आहे.

-दि. १९ जानेवारी १९२९.

## (१६)

# मुंबईचा दंगा

झाला! एकदाचा मुंबईचा दंगा उद्भवला. चेकाळला, शमला. उत्पत्ति स्थिती आणि लय पदार्थमात्रास भोगाव्या लागणाऱ्या तिन्ही अवस्थांतून तो गेला. आता शमल्यानंतर और्ध्वदेहिक विधिसंस्काराचे चितेचे दिव्य तेवढे उरले. दंग्याचे प्रेत चितेवर चढून भस्मावशेष होईतो त्या किती सर्पण टाकण्यात येते आणि सुक्याबरोबर ओलेही किती जळते येवढेच पाहणे बाकी आहे.

मुंबईचा दंगा झाला पण हे काय? मुंबईस किती तरी हिंदु अजून जिवंत! किंबहुना किती मेले हे सहज मोजता येत आहेत- बाकी सगळेच जिवंत! अगदी पूर्वीसारखे सहज मोजमापीच्या मापात न मावतील इतके चिकार जिवंत! आश्चर्य आहे बुवा!

कारण संघटन चालू झाल्यापासून आणि विशेषतः नेहरू प्रतिवृत्तानंतर, हिंदु जगताच्या अगदी जवळ आलेल्या प्रलयाविषयीची भयंकर भविष्ये मोठमोठे मुसलमानी पैगंबर एकसारखे करीत होते. शौकतअल्लींची जळजळीत जीभ म्हणाली, 'हिंदु मला चिडवतात काय? त्यांची खोड लवकरच जिरेल हिंदूंनो, नेहरू प्रतिवृत्त संमत करता काय? **War to the Knife!** खंजिरा-खंजिरानिशी खडाजंगी!' महंमद अल्ली म्हणाले,'हिंदू कोणच्या झाडाचा पाला! मुस्लिम औटलुक म्हणाले,'जर वेळ पडली तर पठाणांना आत बोलावून हिंदूंच्या छातीवर मुसलमानी पाच्छाई उभारू!' इतर मुल्ला आणि मौलवींच्या फतव्यांची आणि फितव्यांची तर गणतीच नव्हती. त्यांचा मतभेद असा एकाच गोष्टीवर होई आणि तो म्हणजे या की, एकंदरीत एक मुसलमान लढाईत किती हिंदूंच्या बरोबर असतो-किती हिंदूंस मारू शकतो- त्या खंजिरा-खंजिरानिशीच्या खडाजंगीत!!' काही तज्ज्ञ म्हणाले, एक मुसलमान ५ हिंदूंस मारू शकतो; काही म्हणाले १०; काही म्हणाले ५०; काही म्हणाले १००! या आणि इतर गणिततज्ज्ञांची सरासरी काढून आम्ही सिद्धांत केला की, एक मुसलमान निदान अठ्ठावीस पूर्णांक तीन पंचमांश हिंदूंस तरी भारी असलाच पाहिजे! तोही हिंदुस्थानी मुसलमान! ज्या पठाणास आत बोलावून हिंदूंच्या छातीवर मुस्लिम बादशाही स्थापिली जाणार आहे, त्या एका पठाणास तर चटणीस देखील शंभर हिंदू पुरणार नाहीत. हा वरील सिद्धांताचा उघड उघड उपसिद्धांत होता. कलकत्यास झालेल्या मुसलमानांच्या शेकडो प्रकट **(Public)** अगर अंतःस्थ **(Private)** सभा-संमेलनातून ही भयंकर भविष्ये जानेवारीत एकामागून एक आमच्या कानावर येऊन आदळू लागली की, हिंदू जगताचा प्रलय कधी येईल याचा नेम नाही! त्या दिवशी हिंदूंची पृथ्वी फिरायचे सोडून भयाचे कापत उभी राहिल.

इतक्यात बातम्यांवर बातम्या आल्या की, मुंबईत पठाणांची आणि हिंदूंची भिडली! शौकतअल्लींनी हीच आग हिंदूमुसलमानांचे दंग्याचे रुप घेणार म्हणून सांगितले! आणि लगेच तसे झाले. पठाण, शेख, सय्यद, शिय्या, सुन्नी; मुसलमान तितका एक झाला. अक्षरशः खंजिरा-खंजिरानिशी खडाजंगी चालली. मुसलमानांच्या हजारो हजारांच्या टोळ्या हिंदूंची कत्तल करीत उठल्या, असे 'टाइम्स'चे स्तंभचे स्तंभ भरत चालले पाहून उभ्या हिंदू जगताची कंबर खचून गेली. वाटले हाच तो हिंदू जगताचा येणार येणार म्हणून गाजलेला प्रलय! आला अखेर!! जो एकेक

मुसलमान निदान अठ्ठावीस पूर्णांक तीन पंचमांश हिंदूंस उपजतच भारी, तो सुरे घेऊन हजारांच्या टोळ्यांनी बाहेर पडलेला! -आता मुंबईस हिंदू म्हणून कुठला उरणार? गणित करकरून पाहिले तो उत्तर हेच. आता मुंबई निर्हिंदू होणार! आणि त्यात पठाण मिळाले. आता अर्थात् मुस्लिम पाच्छाईही हिंदुंचे छातीवर पुनः स्थापिली जाणार! भवितव्यता बलीयसी, असा निश्वास टाकून आम्ही आमची छाती त्या उतजाऊ मुस्लिम बादशाहाच्या तक्ताची पहिली पायरी व्हावी अशा बेताने पुढे करून दाराशी स्वस्थ उभे राहिलो!

तेच रस्तोरस्ती पठाण पहिल्या धडाक्यासच दिसू लागले; पण ते जीव घेऊन पळताना, पडताना, मरताना आणि हिंदुच्या टोळ्या त्यांच्यामागे हातात सापडेल ते हत्यार घेऊन लागलेल्या! पण मनात म्हटले, हिंदूंच्या पुढे प्रथमप्रथम असे पडत, मरत आणि मग मेल्यानंतर एकदम त्यांच्या अंगावर उलटून त्यांचा नायनाट करण्यासाठी पठाणांनी हा एखादा गनिमी कावा चालविला असावा! तेच मोठमोठ्याने एखाद्या बंबासारखा गळा काढून कोणी 'तोबा तोबा,' म्हणुन रडताना ऐकू येऊ लागले. पहातो तो ते शौकतअल्ली ओरडत होते, 'माझे पठाण मारले जात आहेत, हिंदू लोक त्यांची पारध करीत आहेत. सरकार धावा, पोलिस धावा, मुसलामानांनो धावा! तोबा, तोबा!'

वाटले, हे काय मुस्लिम पाच्छाई हिंदूंच्या छातीवर स्थापन करणाऱ्या आशेची ही एकमात्र यष्टी-हेच ते पठाण; त्यांची हिंदू पारध करतात! खंजिराखंजिरानिशी खडाजंगी!' म्हणून गर्जणारा हा आगबंब असा एकाएकी विव्हळू लागतो! एक पठाण पाहतांच चाळीच्या चाळी बंद करून घेणारे हिंदू पठाणांची पारध करीत रस्तोरस्ती हिंडू लागतील हे शक्य तरी कसे होईल! एक मुसलमान अठ्ठावीस पूर्णांक तीन पंचमांश हिंदूबरोबर तरी आहेच आहे!

बरे. पठाणांची पारध केली तर केली. पण मुसलमानांचा जो अतियोग्य आक्षेप आहे की, पठाण ते हिंदूंनी चोपूचोपून काढले ते पठाण म्हणून नाहीत तर मुसलमान म्हणून; त्यास हिंदूंचे काय उत्तर आहे? हिंदूंची ही मात्र अक्षम्य चूक होती. प्रत्येक पठाणाला हिंदूंचा जातिवंत छळक म्हणून मारतांना त्यांच्यातला मुसलमानीपणा वगळून पठाणीपणा तेवढाच त्यांनी का मारला नाही? पण हिंदूच ते! सगळाचा सगळा पठाण गिळंकृत करू लागले. मुसलमानी भाग म्हणून चित्रावतीपुरता देखील दंग्याच्या ताटाबाहेर टाकीनात. अर्थात् मुसलमानांनाही दंग्यात उतरावे लागून ती होणार होणार म्हणून गाजलेली खंजिरा-खंजिरानिशीची खडाजंगी आजच होऊन जाऊ द्या म्हणून मुसलमानांचे रणंशृंग फुंकले गेले.

बरे; एवढ्यावरच हिंदूंचे डोळे उघडावयास पाहिजे होते. मुसलमानांचे वहिवाटीप्रमाणे सुरा उगारला जाताच हिंदूंनी त्या जुनाट वहिवाटीसाठी राष्ट्रीय एकीसाठी निदान त्या अठ्ठावीस पूर्णांक तीन पंचमांश हिंदूबरोबर मुसलमान या कोष्टकाच्या सन्मानासाठी तरी आपल्या माना चटाचट पुढे कराव्यात ना? पठाण मोठमोठे जमाव करून दंगा करतात असा दोष देतो; पण हा तरी आपलाच दोष ना? एकदा पठाण-कामकरी स्वरुप जाऊन हिंदुमुसलमानी स्वरुप त्या दंग्याला येताच जर एक मुसलमान पाहताच अठ्ठावीस पूर्णांक तीन पंचमांश  हिंदु त्याचे पुढे पटकन् जाऊन आपल्या माना देते, तर मुसलमान मोठाले जमाव का करते? शंभर शंभर मुसलमान 'अरे मित्रा, तुझी मान कापू दे' अशी आपली न्याय्य मागणी मागत असता एकेक हिंदु उलट त्यांचेवर दगडफेक करताना जेव्हा

कुठे कुठे आढळून आला, तेव्हा मुसलमानांची ती अठ्ठावीस पूर्णांक तीन पंचमांश ची धर्मभावना दुखविली जाऊन ते जाळपोळ करीत चालले यात काय आश्चर्य? काय अन्याय?

इतक्यावरही थांबले नाही. हिंदुंच्या अंगात हे संघटनाचे भूत आजकाल शिरलेले! त्यामुळे त्या मुर्खांनीही हजारोचे जमाव करून मुसलमानांवर उलट हल्ले चढविले. बरे झाले ती शांतता समिती तरी निर्भेळ राष्ट्रीय ध्वज हाती घेऊन हिंदु रक्तपाताच्या सरीच्या सरीबरोबर ‘हिंदुमुसलमानकी जय!’ च्या सरी पाडीत राहिली! हा शुक्रवारच्या रात्रीच्या ‘हिंदुमुसलमानकी जय’ आणि त्या मलबार रात्रीच्या मोपल्यांच्या ‘स्वराज्य की जय’-हे दोन जयजयकार आपल्या इतिहासात चिरस्मरणीय राहतील! दुर्दैवाने मुंबईत एकच शांतातसमिती होती-म्हणून एकच शुक्रवारची रात्र ‘हिंदुमुसलमानकी जय’च्या गर्जनेने राष्ट्रीय ऐक्य अंशतः तरी दिग्घोषित करू शकली. जर का अशा दहापांच शांतता-समित्या स्थापन झाल्या असत्या तर हिंदु तरी अगदी शांत झाले असते. अगदी म्हणजे अगदी शांत! अगदी स्मशान-शांत!! आणि मग त्या ‘हिंदुमुसलमानकी जय’ तील हिंदु शब्द व्युत्पत्ति-शास्त्रान्वये लोपून केवळ ‘मुसलमानकी जय’ उरता आणि राष्ट्रीय ऐक्य स्थापण्याची या शांतताविशारद शांतता समितीला हिंदूंची आणि निर्भेळ मुस्लिम पाच्छाई स्थापण्याची ती युद्धकलाविशारद खिलाफत समितीतील खलिफांची अशा उभयआंकाक्षा एकसमयावच्छेदे करून मुंबईपुरत्या तरी सफल झाल्या असत्या.

पण या संघटनाने राष्ट्रीयत्वाला अगदी काळोखी लावली. हे आपले देशबंधु म्हणून मुसलमानांसच उलटे म्हणू लागले, आम्ही हिंदुही तुमचे देशबंधुच- म्हणून तुम्हीच आमच्या सुऱ्यास चकार शब्द न काढता बळी पडा! आणि हिंदूंनी मशिदीवर हल्ले चढविले, रस्त्यारस्त्यांनी मुसलमानांस भोसकून काही भाग काही वेळ निर्यवन कले, हजारो मुसलमानी रुपयांची लूट केली, पुरभय्ये ट्रामा अडवून अडवून पठाण भेटला की ओढीत चोपीत चालले. म्हणे आम्हांस शुक्रवारचे रात्रीचा सूड घ्यावयाचा आहे! मुसलमान पाहिला की, मारीत चालले! हिंदुच ते! बहकतील तिकडे बहकतील. चार-पाच वर्षापूर्वी मरत तर मरतच असत; आता मारीत तर मारीतच सुटतात.

काय करावे ‘हिंदुमुसलमानकी जय’चे दुर्दैव! दुसरे काय? मोपल्यांच्या बंडाचे वेळी जसे राष्ट्राचे पुढारीपण खिलाफत धुरंधर गांधीकडे होते,तसे आज जर मुंबईचे असते तर मोपल्यांच्या त्या औरंगजेबी धांदलीत जसे एक का दोन हिंदु कुठेसे बलात्काराने बाटले तसेच मुंबईला ‘एक का दोन हिंदु कुठेसे’ मरते आणि हिंदुंच्या त्या पापासाठी एखादा राष्ट्रीय उपास पाळून त्यांची आत्मशुद्धी करण्याची व्यवस्था सहज करून देता आली असती!

पण संघटनामुळे ही ‘सुडाची’ ब्याद हिंदूंचे मनात घुसली. त्यामुळे सत्यानाश झाला बिचारी शांततासमिती! हेतु किती उच्च! -पण दोन-तीन मुसलमान स्वयंसेवकांस या क्रूर हिंदूंनी जिवासह मारिले, एका पठाणानेही उलठ काठी मारली, पण ती बिचाऱ्या नरिमनांना!

मुसलमानांनी हिंदूंची कत्तल केली, लूट केली ती? असा कोणी देशद्रोही प्रश्न करील. पण त्याने हे विसरू नये की ती मुसलमानांची वहिवाटच आहे. तो मुसलमानंतील दंगेखोर सज्जनां धर्मच आहे. त्या त्यांच्या कडवेपणाची **‘My Bave Moamadan Brothers’** म्हणून हिंदूंनी प्रशंसा करायची की, ‘सूड’ म्हणून आमच्या ‘हिंदूमुसलमानकी जय’वर वार करावयाचा?

पण संघटनाने सगळा विचका केला. देशभक्त स्वातंत्र्यवादी ‘महंमद अल्ली आणि उजवे हात शौकतअल्ली भग्नहृदय होत्साते मुंबईहून दिल्लीस चालते झाले. पुन्हा या देशद्रोही हिंदूंचे तोंड पाहणे नको अशी शेकडो वीरांनी हिंदूंकडे पाठ फिरवीत प्रतिज्ञा केली. युद्धकला विशारद अल्लींनी खरे डोके खांद्यावर आहे तोच दिल्लीचा रस्ता धरला. मुसलमानांची शेकडो प्रेते आणि घायाळूंची कंदने रस्त्यात आडवी आली; पण थांबले नाहीत. दिल्ली गाठली तेव्हाच हुश्श म्हटले ते ठीकच होते. अनुयायांच्या जीवनाचे मरणापर्यंत संरक्षण त्यांनी केलेच होते. कोणाच्या प्रेताकरता का कोणी आपले प्रेत पडेतो अडकून राहतो?

गव्हर्नरांनी मात्र आपले कर्तव्य चोख बजावले दंग्यानंतर ते दंग्याचे ठिकाणांची पाहणी करण्याकरिता दलबलसहित गेले होते. एखादा घाबरट गव्हर्नर असता, तर तो दंगा चालला असतांनाच तिथे जाण्याचा गांवढळपणा करता! या गव्हर्नर महाशयांनी प्रजेच्या दंगा करण्याच्या अधिकारात हस्तक्षेप न करता सर्व दंगा शमल्यानंतर त्या धर्मक्षेत्राची यात्रा केली. आपण नाही का महाभारतानंतर हजार वर्षांनी कुरुक्षेत्राची यात्रा करीत? गव्हर्नर आणखी एखादे वर्ष जाऊ देऊन मग दंग्याची ठिकाणे पाहते तर ही तीर्थयात्रा अधिकच शोभिवंत दिसली असती!

त्याचप्रमाणे गव्हर्नरांनी मि. प्रिस्टले यांच्या कुटुंबासही त्यांच्या हत्येविषयी दुःखप्रदर्शक सहानुभूतीचे पत्र टाकले. जे शेकडो इतरेजन दंग्यात मारले गेले त्यांची कुटुंबे बेपत्ता! मूर्खांना घर ना दार त्यांच्या सहानुभूतीच्या चिठ्या टाकणे अशक्यच होते.

अशा रितीने एक मुसलमान अठ्ठावीस पूर्णांक तीन पंचमांश हिंदूंना मारणारा वीर असूनही आणि अशा वीरांच्या हजारोंच्या सेना ‘दीन दीन’ म्हणून तुटून पडल्य असताही दंगा होऊनही गेला, तरी मुंबईत हिंदू जिवंतच जिवंत आहेत! हजारो बाहेर गावी गेले खरे; पण त्या लुच्च्यांत दंग्यानंतरच्या धरपकडीच्या पारण्यास आपण होऊन उपस्थित राहण्याची फारशी आवश्यकता न वाटणारेही अनेक लोक असू शकतील.

सायमन कमिशनपुढेही बहिष्कारमुळे फारशी माणसे साक्ष देण्यास जात नसली तरी हा दंगा जाऊ शकेल. ब्रिटिश पोलीस नसले तर तुम्ही राज्य कसे कराल? हा प्रश्न आता सायमनला विचारावयास नको. कारण या दंग्याने ती साक्ष आपण होऊनच देऊन टाकली. अनेक भागांत मुंबईस एकही सबळ पोलीस ठाणे नव्हते. ब्रिटिश सरकार असे दोन-चार दिवस कोणत्याही उपयुक्त कामापुरते तरी दिसले नाही तरी हिंदू जगलेच चांगले चाळी-चाळीतून ललकारीत जगले. अगदी मारीत मारीत जगले! तसेच हिंदुस्थानातही जगतील!

सरकारने एक गोष्ट मात्र जरी विवंचून पाहावी. हे दंगे जर असेच चालले, जर गार्ड, मोटारी, मशीनगन्स, चिलखते, गोळीवार लोकांच्या घरोघर सकाळी दूध आणणाऱ्या गवळ्यासारखे काहीही धामधूम उत्पन्न न करता वारंवार येऊ लागले तर या भूतांच्या भयंकर अवडंबराचे भय लोकांतून कमी होऊन, हे दंग्याचे भस्मासून प्रत्यक्ष भूतनाथाच्या डोक्यावरही हात ठेवण्यास धजावयाचे! असले दंगे बंडाचे वस्तूपाठ असतात हे ऐतिहासिक सत्य ब्रिटिश सरकारास काही कोणी शिकविणे नको. पण आपले राजनिष्ठ अंतःकरणास राहवत नाही म्हणून सूचवून ठेविले. मायबाप त्याचा योग्य तो विचार करतीलच!

(१७)

# नेपाळचा दगडी प्रासाद नि सय्यद अहमदचे काचघर

आपल्या काचेच्या घरात राहून नेपाळच्या चिरेबंदी राजवाड्यावर दगडफेक करणारे ते प्रख्यात कोणतेसे सय्यद अहमद खान सध्या कोठे आहेत कोणी सांगाल काहो? 'श्रद्धानंदा'त काही दिवसांपूर्वी अफगाणिस्थानच्या मानाने नेपाळ हा किती तरी हीनतर देश आहे हे त्यांनी नव्हते का सिद्ध करून दाखविले? ते सय्यद अहमद खान! - ते सध्या कुठे आहेत ते सांगाल का कोणी? आम्हांला त्यांना एक अत्यंत आनंददायक बातमी सांगणे आहे.

ज्या काचेच्या घरातून ते इतरांवर दगड फेकीत होते, त्या पत्त्यावर त्यांचे नाव लिहून पत्र टाकणे; पण मृत्यूपत्रालयातून **(Dead Letter office)** ते आमचे पत्रच तेवढे बेपत्ता म्हणून परत आले नाही, तर त्यासोबत ही झणझणीत सूचनाही मिळाली की, 'यापुढे पत्त्यावरील नावे काही विचार करून लिहावी. मागे एकदा 'दिगंबर भट महार' म्हणून एका पत्रावर नाव होते. तेव्हा आम्ही ती वेडगळ चूक विचारात घेतली नाही. पण आता पुन्हा हे 'सय्यद अहमद खान' हे नाव या दुसऱ्या पत्रावर पाहून अशा चुकांकडे कानाडोळा करणे पोस्ट ऑफिसास शक्य नाही. सय्यदाचे नावापुढे 'खान' म्हणजे ब्राम्हणाची जात, महार लिहिल्यासारखे आहे. तेव्हा अशी घोडचूक पुन्हा होऊ नये, नाही तर दुप्पट दंड पडेल'.

पोस्ट ऑफिसातून ही शोभा झाल्यावर 'श्रद्धानंद' पुन्हा काढून पाहिला, तो ते नाव अगदी तसेच 'सय्यद अहमद खान'! पण आता पोस्टाकडे परत ते नांव लिहिण्याचे साहस करण्यापेक्षा श्रद्धानंदातूनच सार्वजनिक पत्रव्यवहार करणे बरे असे वाटून हे विचारीत आहोत की, त्या सय्यद अहमद खानांचा पत्ता कोणास ठाऊक असल्यास आम्हांस सांगावा. निदान ही खालील अत्यानंदाची बातमी त्यांस परस्पर अवश्य कळवावी.

की, त्यांनी नेपाळहून अफगाणिस्थानचे श्रेष्ठतव सिद्ध करण्यासाठी जे जे पुरावे दिले, ते ते त्या वेळेस काही हिंदू लोकांस जरी कडू आणि खोटे वाटले तरी त्या त्यांच्या 'श्रद्धानंदा'तील पत्रानंतर अफगाणिस्थानची जी अपूर्व भरभराट झाली आहे तीवरून आज अफगाणिस्थानच्या शत्रूंनाही ते सय्यद खानचे सर्व पुरावे मान खाली घालून मानावे लागत आहेत. खरोखरच अफगाणिस्थान अत्यंत प्रगतिशील, अत्यंत बलिष्ठ, अत्यंत सभ्य राष्ट्र आहे यात आता कोण शंका घेऊ शकणार आहे?

सय्यद खानांनी लिहिले होते, 'कोठे तो भिकार रानटी, जंगली नेपाळ! परवाच अमिराचा केवढा गौरव झाला पाहिलात ना? दळणवळणाची साधने अफगाणिस्थानात झपाट्याने वाढत आहेत. वाहतूक निर्विघ्नपणे होत आहे. अमीर क्रांतिकारक सुधारणा झपाट्याने करीत आहेत. अफगाणिस्थानची राज्यपद्धती किती प्रगतीपर नि बलिष्ठ. नाहीतर नेपाळची किती कुचकामाची. अफगाणिस्थान बलुचिस्थान घेईल. दुसऱ्या बाजूने तिबेट घेईल. अफगाणिस्थानच्या पाठीमागे

इराण, तुर्कस्थान, रशिया, इजिप्त इत्यादी राष्ट्रे आहेत. अशी मुसलमानी राष्ट्रांची जूट आहे तशी तुमची कोठे आहे? अमीर अमानमुल्लाचा केवढा दरारा!'

सय्यद खानांनी जेव्हा हे अफगाणिस्थानचे सत्यदर्शन व्यक्त केले, तेव्हा अनेक संशयबाज लोकांनी त्या नाके मुरडून म्हटले, हो, हो, जरा थांबा मोटारीबरोबर धावण्यासाठी चेकाळून श्वान प्रथम असे बेफान धावते की, हे मोटारला मागे टाकते की काय म्हणून उकिरड्यावरील त्याच्या जातीभाईस वाटू लागावे!

सय्यद खानची हिंदूंनी कलेली टवाळी शेवटी हिंदूंच्याच गळ्यात आली खरी. कारण सय्यद खानांनी वर सांगितलेल्या सर्व गोष्टींच्या यथार्थत्वाचा अमोघ पुरावा त्यांच्या सांगण्याच्या मागोमाग धावत आला. 'ऋषींना पुनराद्यांना वाचमर्थोनुधावति।' आता हिंदुंना तोंड उघण्यास जागा उरली नाही.

प्रथमतः अमिराविषयी पहा! 'अमिराचा केवढा दरारा, केवढा प्रताप!' म्हणून सय्यद खान म्हणाले. ते कसे अक्षरशः खरे ठरले पहा! भणंग, भामटे, भिकारडे, फकीर, भिस्त्यांची मुले, चोरांच्या टोळ्या, दीडदमडीचे मुल्ला, जो तो अमीर अमानुल्लाच्या डोक्यावरील मुकुटाचा त्रासदायक भार उतरून अमिरास आराम देण्यासाठी पहा कसा त्याच्या डोक्याशी झोंबत आहे! अमिराचा हा केवढा दरारा! आणि त्याच्या प्रतापाविषयी विचारूच नका, दुसरा एखादा भेकड असता तर काबूलवर बच्चा साकूसारखा उपटसुंभ चढून येत आहे हे कळताच आपल्या पूर्वार्जित राजधानीच्या वेशीपाशी झुंजत रणात पडता; पण जिवंतपणी पळता ना परंतु अमानुल्लाने तसे कोणतेही भ्याड कृत्य केले नाही. जसा त्याचा प्रताप तशीच राज्यदक्षता! एक भिस्ती काबूलवर ससैन्य चढून येण्याइतका प्रबळ होतो याची क्रूर अमानुल्लाने प्रथम चौकशी ठेविली नाही. चौकशी झाली तेव्हा प्रतिबंध केला नाही आणि काबूलवर भिस्त्याचा मुलगा चढून आला तरी त्याच्यासारखा यःकश्चित् प्रतिस्पर्ध्याशी आपणासारख्या राजकुलीन पुरुषाने लढणे हे आपल्या योग्यतेस काळिमा आणण्यासारखे आहे असे जाणून बंदुकीचा एकही बार न काढता पराक्रमी अमानुल्लाने पांच पिढ्यांची पैतृक राजवट मुकुटसुद्धा जिथेच्या तिथे ठेवून कंदाहारला पलायन -नव्हे प्रयाण केले. भिस्त्याशी ते काय लढायचे? अशी लढाई करण्याचा कलंक अमानुल्लाने स्वतःस आजपर्यंत नाही तर नाहीच लावून घेतला, तो शूर अमानुल्ला चोवीस तासांत राजधानी हरला, चार तासांत राज्य सोडता झाला, चार मिनिटांत भावास राज्यपद देता झाला, पुन्हा चार मिनिटांनी त्याचे राज्यपद आपणांकडे घेता झाला आणि चार महिने झाले तरी कंदाहारच्या भिंतीच्या आडच्या आड ठाण देऊन राहता झाला. अमिरी गादीवर भिस्ती बसलेलाच आहे; अमानुल्लांच्या अंतःपुरातील नात्यागोत्याच्या राज्यकन्यका चोर पोर आपसांत वाटून घेतातच आहेत. अमानुल्लाच्या शयनागारांत वाटेचे चोर लोळत आहेत, प्रांतोप्रांतीचे अधिकारी 'भिस्ती अमीर की अमानुल्ला! की आम्हीच स्वतः? म्हणून अमानुल्लाच्या अमिरी आज्ञेस अवहेलनेची उत्तरे पाठवीतच आहेत. हा 'अमिराचा केवढा दरारा! केवढा पराक्रम!!'

'अफगाणिस्थात क्रांतिकारक सुधारणा होत आहेत' सय्यद म्हणतात. अगदी खरे; दाढी करावी की वाढवावी, वाढविलीच तर किती अंगुले, किती हात; टोपी घालावी की पगडी? टोपीच घातली तर ती कशी? वाटोळी की उभी, की तिरपी की तुऱ्याची! या अत्यंत गूढ प्रश्नास सोडविणाऱ्या सुधारणा-

आणि त्यासाठी रक्ताचे सडे सांडणारी क्रांती! बच्चा साकूने तर मुलींनाच नव्हे तर मुलांनाही पडदा राखावा, शाळा सगळ्या बंद ठेवाव्यात, रस्त्यात मुल्ला पाहिला की त्याला लोकांनी साष्टांग लोटांगण घालावे, राजकन्यकांना पवित्र आसुरी विवाहाने भिस्त्यांच्या चोरांच्या, चिलटांच्या अंतःपुरांत दडपावे; शीख, अशीख हिंदु पाहिला की लुटावा, काफर म्हणून मारावा, कुराणावाचून कोणी दुसरे पुस्तक म्हणून ठेवू नये, वाचू नये, कुराणच वाचावे, ते धर्मपुस्तक वाचून बच्चा साकू वागतो तसे धर्मपरायणतेने वागावे!! सुधारणावर सुधारणा! अगदी क्रांतिकारक सुधारणा! आणि पुन्हा ते स्थान जेव्हा पिशाच्चस्थान म्हणून गाजत होते त्या वेळच्या पठाणांच्या परंपरेस अगदी धरून! सेनापति नादिरखानच पहाना! पाच वर्षे विलायतेत मुरून आले- पण स्त्रियांस पडदाच योग्य म्हणून मत देतात! 'झपाट्याची सुधारणा' दुसरे काय?

सय्यद खान म्हणतात, 'नेपाळची राज्यपद्धती किती टाकाऊ; अफगाणिस्थानचे राष्ट्रैक्य, जूट, राज्यपद्धती किती प्रगतीपर, किती बळकट!' ते आता कोण नाकारू शकेल? नेपाळात अजून एकच प्रधान, एकच राजधानी. तेच आमचे अफगाणिस्थानात पहा! पाच अमीर! पन्नास राजधान्या! प्रत्येकजण, एक तर कुणी तरी अमीर आहे नाही तर कोण्या तरी अमिराचा प्रधान आहे. प्रत्येक जात दुसऱ्या जातीच्या कंठास बिलगलेली! शिनवाऱ्यांच्या छातीत दुराण्यांची सुरी, शिय्यांच्या छातीत सुन्नींची सुरी! राष्ट्रीय ऐक्य ऐक्य ते आणखी कसे असावयाचे? दर दिवसाला एक दोन नवीन अमीर उत्पन्न करणाऱ्या राज्यपद्धतीहून 'प्रगतीपर' पद्धत ती कोणची असणार? टीचभर अफगाणिस्थानांत तेहतीस टोळ्यांची द्वंद्वयुद्धे जुंपलेली पाहून 'राष्ट्रीय बळकटीचे' दुसरे दर्शक ते काय दाखवावे!

'नेपाळ रानटी'! अगदी खरे, राजकुमारींना भिस्त्यांची मुले ओढीत नेऊन बलात्काराच्या बोहल्यावर नेपाळात कुठे लग्न लावतात? अफगाणिस्थात अमानुल्ला तसा संगसारीने अहंमदीयांस मारीत आणि बच्चा साकू हिंदू शिखांस मारीत आहे आणि सध्या सुन्नी जसे शियाना मारीत आहेत, तसे कोणतेही 'सभ्य' धार्मिक कृत्य नेपाळचे हातून आज हजारो वर्षांत एक तरी घडले आहे का? तिथे न मुसलमानांची काफर म्हणून कत्तल उडत आहे. न हिंदूंत शैव वैष्णवांना मारीत आहेत. 'मुसलमानांची जुट पाहा!' पाहिली बाबा! धन्य आहे मुसलमानांच्या जूटीची! अमानुल्ला बच्चाशी बिलगतो, बच्चा अहंमद खानाशी, शिनवारी दुराण्याशी, दुराणी खास खेलाशी! जूटच जूट! एकीच एकी. ज्याची त्याची जीवश्च कंठश्च गांठ पडलेली!

अशा जुटीचे अफगाणिस्थान 'एका बाजूस तिबेट, दुसऱ्या बाजूस सिंध-पंजाब जिंकून घेईल' हे काय सय्यदांनीच सांगावयास पाहिजे! त्या वेळेस वीरवर अमानुल्लाच अफगाणिस्थानाचा पुढारी होता म्हणून सय्यद, तिबेट, पंजाबच्या विजयावरच संतुष्ट झाले. पण आता तर अमानुल्लाच काय, पण त्याची बायको, त्याची आई, त्याचा भिस्ती, त्याचा भाऊ त्याचा हुजऱ्या, त्याचा सेनापती- सगळेच रणांगणात उतरलेले, सगळेच अमीर. आता अफगाणिस्थान नुसत्या डाव्या उजव्या, पुढच्या, मागच्या देशांसच जिंकून न थांबता खाली भूगर्भीय अग्निलोकांवर आणि वर आकाशीय चंद्रलोकांवरही स्वारी केल्यावाचून राहणार नाही.

'अफगाणिस्थानास जेव्हा समुद्राची आवश्यकता भासेल तेव्हा पश्चिम समुद्रास हस्तगत करण्यासाठी तो हिंदुस्थानचा सिंध ते काठेवाडपर्यंतचा देश जिंकिल!' सय्यदांच्या या म्हणण्यात त्यांच्याच नव्हे तर उभ्या अफगाण राष्ट्राच्या महत्वकांक्षेचा स्पष्ट उच्चार झालेला आहे. पण ही बातमी काही आजच आम्हांस कळली नाही. ती लहानपणांपासून ऐकत आहोत. अमिराच्या बापाने त्याच्या आणि बापाच्या बापानेही हिंदी सागराच्या तटाकी एकदा तरी समुद्रस्नान घडावे म्हणून धापा टाकीत जीव सोडले पण ते समुद्रस्नान घडले नाही. सध्या अफगाणिस्थानच्या टीचभर नद्यांतच जे राष्ट्र गटांगळ्या खात आहे, ते प्रथम त्या नद्या पार उतरू द्या आणि मग जगले वाचले तर मग हिंदी महासागर आपल्या ओंजळीत भरून घेण्यास येऊ द्या. हिंदीमहासागरही वाटच पहात आहे अफगाणांची समुद्रस्नानासाठीच नव्हे तर समुद्रसमाधीचीही हौस फेडण्याइतका तो खोल आहे.

'अफगाणिस्थानात दळणवळण आणि वाहतूक निर्विघ्नपणे होत आहे.' कोण नाही म्हणतो? एका प्रवाशास शंभर शिपायांचे संरक्षण सैन्य घेऊन एका मैलाला एकशेएक जिवावरच्या संकटांना गाठल्यानंतर जगला तर अगदी 'निर्विघ्नपणे' दुसऱ्या मैलांत प्रवेशता येते खरेच! पण अफगाणिस्थानच्या प्रबलतेची शेवटची साक्ष म्हणजे सय्यद खान आणि शौकत अल्लीखान आणि अहंमद अल्लीखान इत्यादी खिलाफतधुरंधर लोक म्हणतात की मुस्लिम जगाच्या अमानुल्लाला असलेल्या पाठिंब्याची होय. 'इराण, तुर्कस्थान, इजिप्त, अरब या सर्व मुस्लिम जगाचा अमानुल्लांना पाठिंबा आहे' आहे तर! तसा तो पाठिंबा होता म्हणून तर अमानुल्लांना सिंहांसनावरून ओढण्यासाठी बच्चा साकू २५ माणसांनिशी काबुलात आला आणि अमानुल्ला कंदाहारला निघून गेला! अमानुल्ला नुकतेच युरोपातून, टर्कीहून, इराणाहून त्या वेळेस देशी आलेले होते. मध्यंतरी रशियाच्या दिग्गजानेही आपल्या पाठीवर ही अफगाणी माशी क्षणभर बसू दिली होती. त्यामुळे रशियाही अमानुल्लाच्या पाठीशी उभा आहे असे सय्यदांनी म्हटले ते ठीकच होते. आम्हीही म्हणतो रशिया अफगाणिस्थानच्या पाठीशी आहे - जसा पारधी मृगाच्या पाठीशी असतो. रशियाच का इंग्लंडचा नाही का अफगाणिस्थानला पाठिंबा? अमानुल्लांना नसेल तर बच्चा साकूला असेल - पण कोणा तरी अफगाणास इंग्लंडचाही पाठिंबा आहेच! खिलाफतवाल्यांनी वर्णिलेले पॅन-इस्लामी ऐक्य खरोखर फार प्रबळ! अमानुल्ला संकटात पडताच पहा कसा केमालपाशा चार-साडेचार तुर्की माणसेही काबूलाकडे धाडता झाला! आणि ती चार माणसेही काबूलला जाण्याचे आधीच परत केमालकडे कशी तातडीने निघून गेली!

आता पॅन-इस्लामाच्या हितास्तव आणि प्रेमास्तव या खिलाफत धुरंधरास- विशेषतः आमच्या हिंदी खिलाफतीस आमची एक सूचना आहे. ती हीच की, यापुढे त्यांनी कोणावरही खलिफा म्हणून लालची दृष्टि टाकण्याची घाई करू नये. कारण काय असेल ते असो, त्यांनी दृष्टि टाकली की ती दृष्ट लागते. प्रथम तो तुर्की खलिफा-बिचारा सुखासीन होता. पण या हिंदी खिलाफतवाल्यांनी त्याला 'खलिफा' म्हणून त्याचेसाठी खटपट करण्यास आरंभ करताच बिचाऱ्याचा सत्यानाश झाला. होती ती खिलाफत गेली. देशोदेशी भीक मागत फिरू लागला. तोच यांची दृष्टि केमालवर पडली. पण केमालने तर कमालच केली. खलिफाचीच नव्हे तर खिलाफतीचीच त्याने खिरापत उडविली.

मध्यंतरी निजामला खलिफापणाचा टिक्का लावण्यास गेले तर त्या बापड्याची जी दैना उडाली ती विचारूच नये. खिलाफतीच्या वाऱ्याने फुगलेला तो हैद्राबादी फुगा व्हॉईसरायांच्या चिमटीच सापडताच फटकन् फुटून गेला. कसला ठराव आणि कसला स्वतंत्र रालेपणा! युरोपियन बबर्जीवरही सत्ता चालेनाशी झाली. इतक्यात खिलाफत लालसेस अमीर अमानुल्ला दिले. अमानुल्लाच्या डोक्यावर धरावयास सतृष्ण दृष्टीने धजतात तो तीच दुष्ट लागून त्या अभिषेकपात्रातच अमानुल्लाची अमिरीही बुडून मेली! म्हणून आता दुसऱ्या कोणाला तरी त्या अशुभ पदवीची अवदसा न भोवो या सद्हेतूने आम्ही ही सूचना खिलाफतवाल्यांस करीत आहो! कारण अलीकडेच ऐकलं की, गाजी बच्चा साकूशी महमंदअल्ली सोन्याच्या दूरध्वनीतून - टेलिफोनमधून - बोलू लागले आहेत. म्हणून ही विनंती की, आता बच्चा साकूला तरी खलिफापणाची दृष्ट लावून त्याचा सत्यानाश करू नका! अजून बच्चा आहे तो! चार दिवस राजवाड्याची मजा मारू द्या त्याला! पुढे मागे त्याचा नाश जेव्हा अगदी जवळ येईत तेव्हा पॅन-इस्लामचा खलिफा होण्याची आकांक्षा आपण होऊन त्याचे डोक्यावर येईलच!

आता सय्यद खानाचा निराप घ्यावयाचा. पण तो बिचाऱ्या 'जंगली, असभ्य नि असंघटित' नेपाळी भाषेत न घेता त्याच्या अफगाणिस्थानच्या पूज्य असलेल्या कवि हजरत शेख सादी यांच्याच शब्दांत घेणे बरे. सादी म्हणतातः-

(फारसी)

सदिया! आज रोजे अजलहुस्न ब तुर्की दादन्द
अल्को दानाई फअम ब यूना दादन्द
नाजो अजज क्रिश्मा हमा दर आलम हिन्द
बेवकुफह व जहालत खास अफगां दादन्द

अर्थात् : हे सादी! सृष्टीची रचना होताना रूप् तुर्कांना मिळाले, विद्या आणि बुद्धि यूनांना (ग्रीकांना) मिळाली, कोमलता, माधुर्य, हावभाव, सभ्यता हिन्दुस्थानच्या वाट्याला आली आणि उनाड मूर्खता नि पिशाच्चपणा अफगाणिस्थानला देण्यात आला!'

नमस्कार सय्यदखान, येतो आता.

-दि. ३० मार्च १९३९

## (१८)

# हुतात्मा राजपाल आणि महात्मा गांधी

गेल्या पाळीला पार्लमेंट सभेत हिंदुस्थानला औपरिवेशक सत्ता '**Domenition status**' द्यावयाची की नाही याविषयी जो मनोरंजक वादविवाद झाला, त्यात एका गंभीर दुःखाची जी बातमी बाहेर फुटली, ती विषयी इंग्लिश असो वा हिंदी असो, पण प्रत्येक सहृदय मनुष्यास सहानुभूती वाटल्यावाचून राहणार नाही. त्या वादाचे भरात इंग्लंडचे एक प्रमुख पुढारी आणि उभ्या जगातील एक प्रमुख कारस्थानी मि.बाल्डविन हे म्हणाले 'तुमच्या आमच्या डोळ्यादेखत तरी

हिंदुस्थानला औपनिवेशिक सत्ता-वसाहतीचे स्वराज्य-मिळणे शक्य नाही!' कोण दुःखकारक बातमी ही!

हाय! हाय! मि. बाल्डविन आणि ज्या पार्लमेंटच्या सभासदांस उद्देशून ते असे म्हणाले की, 'तुमच्या आमच्या डोळ्यादेखत तरी हिंदुस्थानला स्वायत्तता मिळत नाही,' ते इंग्लिश सभासद, ह्या साऱ्या सज्जनांचे डोळे इतक्या लवकर मिटणार ना! आम्हांस बॉल्डविनसाहेब अवघ्या वर्षाचेच आत सोडून जाणार ना! हाय हाय!

कारण औपनिवेशिक स्वराज्य तर एक वर्षाचे आतच मिळणार असे भगतसिंगादिकांनी परवा लाहोर कोर्टात सांगून टाकले; इतकेच नव्हे तर त्या समयी आमची सर्वांची मुक्तता होणारी असल्याने तुम्ही या खटल्याचा नसता त्रास घेत बसण्याचे सोडून खुशाल विसावा घेत बसावे म्हणून कोर्टास अनुरोधही (शिफारसही) केला. तेव्हा औपनिवेशिक स्वराज्य एक वर्षातच मिळणार हे क्रांतिकारकांचे भविष्य आणि ते त्यास खरे करून घेणारच; आणि तिकडे बॉल्डविनही काही भलतीच प्रतिज्ञा, करणारे अनुत्तरदायी '**ireesponsible**' गृहस्थ नाहीत! अर्थात् एक वर्षाच्या आत मि. बॉल्डविनांचे आणि पार्लमेंटातील त्यांच्या पुढच्या त्या दिवशीच्या सर्व सभासदांचे डोळे नित्याचे मिटणार हे उघड आहे! हाय! हाय! कोण हा दुःखद प्रसंग!

भारतभक्त भगतसिंग म्हणतात, एक वर्षाचे आत स्वराज्य मिळणार! ब्रिटनभक्त बॉल्डविन म्हणतात, माझ्या डोळ्यादेखत तरी काही स्वराज्य मिळत नाही. या दोघांच्याही प्रतिज्ञा खोट्या होऊ नयेत अशी-

कारण ते दोघेही गृहस्थ आपल्या या ब्रिटिश साम्राज्यातील त्या त्या देशातील माननीय देशभक्त् आहेत. कोणीही खोटा ठरला तरी तुम्हा आम्हां ब्रिटिश साम्राज्यांतर्गत सुराज्यात राहू इच्छिणाऱ्या अवघ्या हिंदी इंग्रजी नागरिकांच्या ब्रिटिश साम्राज्याच्या सामष्टिक अभिमानाला दुखापत होणारी आहे; तेव्हा या दोन्हीही प्रतिज्ञा खऱ्या ठरविण्याचा एकच एक जो अर्थ, जो मार्ग त्यातून निघतो तोच साम्राज्याभिमानी बॉल्डविनसाहेब स्वीकारतील आणि आपले डोळे या वर्षाच्या पहिल्या अर्ध्यातच नित्याचे मिटून ह्या वर्षाच्या दुसऱ्या अर्ध्यात हिंदुस्थानास औपनिवेशिक स्वराज्य मिळण्याचा दिवस उजाडू देतील यात आम्हांस काहीच शंका वाटत नाही. तरीही बॉल्डविनसारखा मोहरा इतक्या अनपेक्षित शीघ्रतेने आम्हा सर्वांस अंतरणार ही बातमी त्यांच्या स्वतःच्याच तोंडून ऐकल्यामुळे दुःख मात्र अत्याधिकपणे झाल्यावाचून राहत नाही. इंग्लिश पार्लमेंटवर हा मोठाच प्रसंग कोसळणार खरा : गाय फॉक्सच्या वेळचे संकट देखील इतके भयानक नव्हते! जे हिंदुस्थानचे स्वराज्य एका वर्षात मिळणारच आणि त्याच वेळी पार्लमेंटातील, 'तुमच्या आमच्या डोळ्यादेखत काही मिळण्याचा संभव नाही!' इतक्या तरूण, बाल वृद्ध अशा थोर थोर ब्रिटिश सभासदांच्या आयुष्याची दोरी अशी अकस्मात इतकी आखूड व्हावी ना! हाय! हाय! ईश्वरेच्छा बलीयसी! दुसरे काय!

तिकडे बर्कनहेडवर असा वाईट प्रसंग गुजरणार तरी आहे. पण इकडे धर्मवीर राजपाल यांची हत्या करणाऱ्या अलामदिनावर तर याहूनही वाईट प्रसंग गुजरून देखील गेला! हिंदु धर्मवीर राजपालाची हत्या करणारा हा मुसलमान गाजी अलामदिन-जीव वाचविण्या करिता सारखी धडपड करीत

असता ती सर्व निष्फळ ठरून शेवटी फासावर लटकला! आणि अशा प्रकाराने 'रंगीला रसूल' प्रकरणाला शेवटी अशी अगदी अक्षरशः मूठमाती दिली गेली. मुसलमानांचेच प्रेत पुरताना! हिंदूचे नव्हे!

कारण राज्यपालाला मारले तेव्हा मौलवी जाफर अल्ली संतुष्ट ऐटीत म्हणाले होते की, राजपालाच्या मृत्यूने 'रंगीला रसूल'ला मूठमाती मिळाली; पण शेवटी ती त्यांची घोषणा फार घाईची ठरली कारण राजपालाचे प्रेताला हिंदूनी अग्नि दिला-मूठभर माती नाही आणि त्या अग्निच्या डोंबाने होरपळून आज जेव्हा अलामदिन फासावर लटकला, तेव्हा त्याला दिलेल्या मूठमातीतच त्या 'रंगीला रसूल'ला खरी मूठमाती मिळाली.

आता ती मूठमाती मातीत मिळून गेली असल्याने या प्रकरणाला एकंदर आढावा काढून हाती काय राहते ते पाहण्यासाझी जर आपण ती मातीची मूठ थोडीशी चाळून पाहू लागलो, तर असेच दिसून येते की, मुसलमानास तरी हा सवदा एकंदरीत फारसा स्वस्त पडला नाही. कारण एका हिंदू राजपालासाठी त्यांनी तीन माणसे कामास आली. राजपालावर पहिला गाजी जो चालून आला, तो सात वर्षे तुरूंगात सडत आहे. दुसरा गाजी चालून आला तो चवदा वर्षे तुरूंगात डांबला गेला. ह्या तिसऱ्या गाली अजामदिनने राजपालला मारले पण तो तर स्वतःच फाशीवर खेचला जाऊन पुरता लंबा झाला. एका हिंदूसाठी मेले नि अर्ध मेले मिळून तीन मुसलमान खर्ची पडतात! त्यावर पुन्हा पिंड दक्षिणा म्हणून खटल्यापायी प्रिव्ही कौन्सिलपर्यंत चार-पाच लाखंवरचा व्यय! अशा महाग दराने हे नसते भांडण विकत घेण्याची मुसलमानांची खुमखुम अजूनही जिरली नसेल, तर त्यांनी ते सुखेनैव चालू द्यावे. प्रत्येक मुसलमान एक गाजी अलामदिन झाला तरी ते आहेत सात कोटी. एक हिंदू राजपालास तीन मुसलमान याप्रमाणे फार फार तर तीन कोटी हिंदूवारी तो सात कोटी गाझींचा सगळा परिवार, अगदी सगळा कामास आला, तरी हिंदु १९ कोटी बाकी उरणारच आणि मुसलमान? शून्य!

ही गोष्ट ध्यानात ठेवून आता यापुढेही हा गुंडपणा चालविण्याची मुसलमानांची छाती असेल तर त्यांनी सुखाने चालवावा! राजपालाला मारले म्हणजे हिंदू दबतील ही त्यांची समजूत त्यांचाच सत्यानाश करण्यास कारणीभूत होईल. हे या प्रकारावरून उघड होत आहे. हिंदु पूर्वी केव्हा केव्हा गुंडगिरीने दबत पण आता हे संघटनयुग आहे. आता ही तुमची गुंडगिरी तुम्ही थकाल तोपर्यंत सुखाने चालू द्या!

वास्तविक पाहता 'किशन तेरी गीता जलानी पडेगी' अशा मुसलमानी कृष्णनिंदेस उत्तर म्हणून राजपालाने 'रंगीला रसूल' लिहिले. त्यात महंमद महाशयांच्या चरित्रातील ऐतिहासिक गोष्टीच बहुशः असल्याने कोर्टाने राजपालास निर्दोषी म्हणून सोडून दिले. पण मुसलमानांस हवेच होते तर त्यांनी फारतर त्या पुस्तकातील विधाने खोडणारे दुसरे एक पुस्तक प्रसिद्ध करावयाचे होते कोटिक्रमाला कोटीक्रम चालू राहता. पण नाही. मुसलमानांना कोटीक्रम कशाशी खातात हे काय ठाउक? पैशाचिक लाठीक्रमानेच केव्हा केव्हा काम भागे म्हणून त्यास ती चटक लागली. पण आता ते दिवस गेले. राजपाल धीटपणे आपले आर्यसमाजी प्रचारकार्य करीतच चालला. मेला तेव्हा तीन मुसलमान खर्ची पाजून आणि हिंदूपेक्षा मुसलमानांसच तो सवदा महाग करून मेला. त्याने

हिंदुधर्माचा पक्ष घेतला म्हणूनच त्यास मरण आले. यास्तव हिंदू त्याचा धर्मवीर राजपाल म्हणूनच गौरव करू लागले आणि शेवटी जेव्हा दोन लाख मुसलमानांच्या डोळ्यातून पाण्याची टिपे आली, त्यांनाही हाय तोबा! करणारी प्रेतयात्रा 'गाझी' अलामदिनचे प्रेत घेऊन काढावी लागली, तेव्हाच या 'रंगीला रसूल' प्रकरणास खरी मूठमाती मिळाली!!

ज्या मुसलमानाने 'किशन तेरी गीता जलानी पडेगी' म्हणून म्हटले आणि हा वाद माजविला, त्याच्या पापाचे प्रायश्चित दुसऱ्या मुसलमान अलामदिनच्या फाशीवर द्यावे लागले आणि दोन लाख मुसलमानांना ओरडत ओरडत त्याला मूठमाती द्यावी लागली.

राजपालाच्या सवद्याइतका महाग जरी नसला, तरी अलिबागच्या पटवर्धनाचाही सवदा मुसलमानांना स्वस्त तरी पडला नाहीच. पठाणाने पटवर्धनांना सूरीने भोसकले; पण पठाणास फाशीवर लटकून लंबे व्हावे लागले. शेवटी एकास एक-डोळ्यास डोळा-दातास दात -गळ्यास गळा, जिवास जीव द्यावा ह्या अटीवरही जरी मुसलमानां नी हा खेळ असाच चालू ठेवण्याची छाती असेल, तरीही आमची ना नाही त्यांच्या सात कोटींस आमच्या सात कोटीचा छेद गेला तरी बाकी उरले पंधरा कोटी! - हिंदू!

कोणी भला माणूस सहज विचारील की, अहो, पण हे डोळ्यास डोळा आणि दातास दात असे चालायचे कुठपर्यंत? तर आम्ही म्हणू 'भाबड्या माणसा, जो आततायीपणा होऊन होऊन खाजवून खरूज काढतो तो अंग रक्तबंबाळ होऊन त्यास खाजविण्याचा कंटाळा येईपर्यंत! ते त्यास विचार! आणि त्याची हौस नाहीच जिरली तर? चाललाच आहे हा खेळ असा. आम्ही नको म्हणून काय होते? तो होऊन चालून येतो, तिथे रडून काय उपयोग? दोघांपैकी कोण्या एकाचे तरी दोन्ही डोळे आणि बत्तीसही दात उखडून पडेतो हे डोळ्यास डोळा आणि दातास दात असंच चालणार असेल, तर हपापाचे सारे दात उपटून खेळ बंद होण्यापेक्षा शक्य तर गपापाचे दात उखडून तो खेळ बंद करणे निदान अधिक अन्यायाचे तरी होणार नाहीच नाही! म्हणून पुन्हा एकदा हमी देऊन सांगतो की, यापुढे हिंदू काही 'सोड' म्हणून म्हणत नाहीत. आततायीपणा चारी मुंड्या चीत नव्हेतर अगदी निपचीत पडेपर्यंत असेल ज्याची छाती त्याने झुंजून घ्यावे! ya निश्चयास धर्मवीर राजपालाची चिता साक्ष! दीनदयाळ पटवर्धनांचे प्राण साक्ष! कारण ते दोन्हीही सौदे हिंदूना काही महाग पडले नाहीत- मुसलमानांना स्वस्त तर पडले नाहीतच नाहीत तेव्हा आणखी कोणा मुसलमान कवीची छाती असेल तर त्याने 'किशन तेरी गीत जलानी पडेगी' अशी कविता पुन्हा लिहावी म्हणजे त्या सगळ्या नाटकाची पुनरावृत्ती होत होत पुन्हा एखादा अलामदीन फासांवर लटकत लंबा होईल; त्यास आमची काही आडकाठी नाही. तुम्हास परवडेल तो तुम्ही पाहिजे तर तुमच्या प्राणान्तापर्यंत देखील ह्या गाजीपणाच्या निशेचा उपभोग घेत असावे.

हो; परंतु अलामदीनला दोन लक्ष मुसलमान गाजी म्हणून, 'शहीद' म्हणून, 'हुतात्मा' म्हणून लाहोरला मिरवीत असता त्या गोंगाटाने आमच्या महात्मा गांधींच्या समाधीचा लवमात्र भंग झालेला दिसत नाही कसा? ती अभंग समाधी आहे असे म्हणावे तर राजपालाच्या प्रेतास जेव्हा लाहोरच्या लाखों हिंदूनी मिरवीत नेले आणि 'धर्मवीर राजपाल की जय' म्हणून गर्जना केल्या, तेव्हा हीच समाधी पिसाळून उठून एखाद्या लोहाराच्या भात्यासारखी फोफावत, एखाद्या

नागिणीसारखी फुत्कारत त्या मिरवणूकीस डसावयास धावली होती. राजपालाचे प्रेत मिळेना पण हिंदूनी पोलिसांच्या मोठ्या मारहाणीस न जुमानता ते प्रेत सोडवून आणले. उभे हिंदू लाहोर त्या राजपालाच्या प्रेतावर फुले उधळीत आणि 'जय धर्मवीर' म्हणून गर्जत चालले. मुसलमानांनी हिंदुंच्या त्याच चिकाटीची नक्कल करून अलामदीनच प्रेत सोडविले आणि 'गाझी' म्हणून गर्जत मिरविले. ह्या दोन गर्जनेत अलामदीन आततायी असल्याने, सूरा उपसून हत्या त्यानेच केली असल्याने वास्तविक पाहता कोणाही अहिंसेच्या खऱ्या भक्तास त्याच्या मिरवणूकीचा अधिक तिटकारा यावयास पाहिजे होता; पण नाही. तिचा तिटकारा महात्मा गांधींस आला नाही. त्याला गाझी म्हटल्याविषयी मुसलमानांस दोष देणारा एक शब्दही त्यांनी लिहिला नाही; पण राजपालला धर्मवीर म्हणून गौरविल्याविषयी मात्र त्यांची समाधि, शांति हिंदुना शिव्या हासडण्याइतकी चिडून उठली.

ते म्हणाले, महाराष्ट्रीय वाचकांस माहित नसेल म्हणून पंजाबच्या हिंदूंच्या जिव्हारी लागलेली ही गोष्ट सांगतो की, -गांधीजी चिडून म्हणाले, राजपाल एक केवळ पुस्तक विक्रेता. मुसलमानांच्या मनोवृत्ती दुखविणारे पुस्तक त्यापे छापले. त्यापायी तो मारला गेला, त्यामध्ये त्याने कोणते मोठे धर्मवीरत्व दाखविले? त्याने छापलेली पुस्तके सगळी विकली गेली होती. तेव्हा त्याला कवडीचाही तोटा झाला नाही, मग कोणचा स्वार्थत्याग त्याने केला?

महात्मा गांधीच्या म्हणण्याचा एकंदरीत मथितार्थ असा की, पोटासाठी पुस्तक छापले; ते पैसे घेऊन विकले. त्या धंद्याच्या भानगडीत तो मारला गेला. त्यात धर्मवीरत्व ते कसले? यास्तव राजपालला 'हुतात्मा' म्हणून गौरविणे हिंदूचा केवळ मूर्खपणा आहे.'

'राजपालच्या पुस्तकाची विक्री झाली होती' म्हणून तो स्वधर्मार्थ मारला जात असताही त्यास हुतात्मा म्हणायचे नाही, मग गांधीजींची पुस्तकेही ते नेहमीच विकीत असल्याने आणि विशेषतः त्यांचा 'यंग इंडिया' ही वर्गणी उकळूनच चालेला असल्याने त्यास तरी महात्मा का म्हणावे? 'राजपालाला धंद्याच्या भागगडीत मृत्यू आला् असे म्हणण्याचा निर्लज्ज कोटीक्रम असेही म्हणू शकते की टिळकांनाही धंद्याचे- केसरी पत्राचे -भानगडीतच कारावास घडला, शिक्षा झाल्या; मग त्यास लोकमान्य का म्हणा?

'राजपालाची धंद्याच्या भानगडीत हत्या झाली.' समजा झाली. पण त्याने हत्या केली तर नव्हती ना? मग धंदा करीत होता म्हणूनच राजपालला 'धर्मवीर' म्हणून म्हणताच चिडून जाणारे हे न्यायाचे आणि अहिंसेचे आचार्य, सूरा उपसून दुसऱ्यास छपून भोसकीत सुटणाऱ्या भ्याड हत्यारी अलामदीनला गाझी म्हणणाऱ्या मुसलमानांविषयी का नाही निंदेचा एक चकार शब्द काढीत? न जाणो क्वचित असेही असेल की, हिंदूना मुसलमानांनी सुरा घेऊन भोसकणे हे अहिंसेच्या तत्वास तितकेसे जाचक नसेल- जसे इंग्लिशांसाठी जर्मनांना ठार मारणे हेही अहिंसेविरूद्ध नव्हते.

महाशय राजपालांनी केवळ धंदा करूनच जीवन घालविले असते, तर ते मुसलमानांच्या डोळ्यात इतका खुपतेच ना! ते आर्य समाजाचे कट्टर अभिमानी आणि सेवक होते. श्रीकृष्णांची मुसलमान करीत असलेली निंदा सहन होईना म्हणूनच त्यांनी 'रंगीला रसूल' हे पुस्तक त्यातील धोका माहीत असून जाणून बूजून प्रसिद्ध केल आणि मुसलमानांचे डोळे त्या अंजनाने झणझणू लागताच ते उलट

प्रसन्न झाले. त्यांना धंदा करावयाचा होता, तर श्रद्धानंदांच्या मारेकऱ्यांचे अब्दुल्लांचे चरित्र लिहून आणि त्यात ‘भाई अब्दुल्ला’ म्हणून गौरवपर नाव देऊन ‘यंग इंडिया’ सारख्या त्याच्या प्रती मुसलमानांत लाखांनी खपविल्या असत्या किंवा ‘आपल्या शूर मोपल्यांच्या’ धर्मनिष्ठेचे गोडवे गाणारे आणि नळबाजारात त्यांनी अत्याचार केलेच नाहीत म्हणून सांगणारे एखादे कल्पित इतिहासाचे पुस्तक प्रसिद्ध करून खिलाफत कमिटीकडूनच नव्हे तर साबरमती आश्रमातूनही त्या हिंदूद्वेषाच्या पाप पुण्याचा पुरस्कार शेकडो रुपयात मिळविला असता!

निदान पक्षी आपले भोपाळचे नबाव तर होतेच की नाही! हिंदू जनता धर्मच्छलाने त्या दुष्ट राज्यात संत्रस्त होत असता मुसलमानी गुंडगिरीला बळी पडणाऱ्या त्या राज्यातील हिंदु मुलामुलींचे आक्रोश ‘कर्मवीर’ सारख्या गांधीवेड्या पत्रातूनही प्रति अंकी ऐकू येत असता, हिंदू भाषा, हिंदू धर्म, हिंदू संस्कृती यांस मारून सारखे मुसलमानीकरण् त्या राज्यात चालले असता महात्माजी जसे त्या भोपाळात जाऊन जाणून बूजून सांगते झाले की, भोपाळची प्रजा नवाबांच्या राज्यव्यवस्थेने संतुष्ट आहे! ज्या नवाबाची नुसती एक चैनीची मोटार इतकी मूल्यवान आहे की, तीत स्नानगृहे, पानगृहे, शय्यागृह असा राजवाड्याचा राजवाडाच उठवून दिला आहे आणि भर युरोपात तिला एका चढाओढीत अलीकडेच भव्यतेत पहिल्या क्रमांकाचा पुरस्कार मिळाला आहे. ‘त्या नवाबाची’, गांधीजी म्हणाले , ‘राहणी अगदी साधी आहे! आणि तो जवळजवळ रामराजाच आहे!’ आम्ही म्हणतो, जर महाशय राजपालला केवळ पुस्तक विक्रीचा धंदा करावयाचा असता, तर त्याने ‘भोपाळचा रामराजा आणि त्याचा भाट साबरमतीचा वाल्मीकी’ म्हणून एक पुस्तक प्रसिद्ध करून हे गांधीविरचित भोपाळच्या नवाबाचे चरित्र त्यात छापले असते. म्हणजे महात्मा गांधीसारखा, महाशय राजपालांचा हातही भोपाळच्या नवाबांनी ओला केला असता; इतकेच नव्हे तर त्या राजपालालाही मुसलमान लोक महात्मा म्हणून म्हणू लागते; हिंदू तर म्हणतेच म्हणते. कारण जो सावावर पडलेल्या घावापेक्षा चोरावर पडलेल्या घावास पाहून अधिक दुःखार्तपणे रडतो, त्यासच ते महा दयाळू म्हणतात. जो मनुष्याच्या मुलाच्या पुढचे दूध ओढून घेऊन सापाच्या पिलास पाजतो, त्यासच ते महासात्विक समजतात. जे दोन्ही पायांवर न चालता डोक्यावर चालतो त्यासच ते महान तपस्वी मानतात.

हिंदू धर्माची निष्ठा आणि हिंदुत्वाचा यथार्थ अभिमान महाशय राजपालांनी तिनदा प्राणावर बेतली तरी सोडला नाही म्हणूनच तो खरा धर्मवीर होता. म्हणूनच संघटनांभिमानी लाखों हिंदूनी त्याच्यावर कृतज्ञतेची फुले उधळली आणि म्हणूनच महात्मा गांधीस ते वावडे लागले. कारण संघटनांनी प्रचंड चळवळ त्यांच्या शिव्याशापास कवडीच्या उधारीने न विचारता भरभराट आहे. हे त्यास सहन होत नाही हीच खरी गोष्ट आहे. त्याचा वचपा काढण्यासाठी ते संघटनांवादी हिंदू ज्याला धर्मवीर म्हणतील त्याची हटकून निंदा करतात, आणि ज्याची निदां करतील त्या भोपाळराज्यासारख्या हिंदूद्वेष्ट्या संस्थानिकांची हटकून स्तुति करतात. हिंदू संघटनात त्यांचा बडेजाव नाही म्हणून त्याचा द्वेष आणि हिंदू संघटन कार्यास मिळावे तर मुसलमानांची लाठी आणि सुरे डोक्यावर गरगर फिरत राहणार- ही भीति; हा पेच आहे दुसरे काय?

बरे झाले; लंकेत सध्या रावणाचे राज्य नाहि म्हणून. नाही तर हिंदु संघटनांच्या मत्सराने हिंदुद्वेष्ट्या भोपाळच्या नवाबाची जशी त्यांनी हटकून धंदेवाल्या पाठकांनाही लाजवील अशी स्तुती केली, तशीच ते लंकेला खादी दौऱ्यावर जाऊन रावणचीही स्तुति करावयास सोडते ना! भोपाळच्या नबाबाविषयी म्हटले तसेच म्हटल्यावाचून राहतेना की ‘रावण राज्यात सर्व प्रजा संतुष्ट आहे- अशोक वनातील बंदीवान सीतेसुद्धा! रावण रामराजाच आहे!

-दि. ३० नोव्हेंबर १९२९

(१९)

# शंकराचार्य महाराजांची नि जॉनबुल महाराजंची सूचना

छळकांचीही एक जात असते. जगभर छळकांची विचारपरंपरा म्हणूनच एकसारखी आणि एकासाची बनते. मग तो छळक कोट पालटून टोपीधारी कोणी जॉनबुल असो किंवा काषायकौपीन मुंडधारी कोणी पीठेश्वराचार्य असो.

जर कोणास याचे प्रत्यंतर पहावयाचे असेल, तर त्यांनी शारदा पीठाच्या शंकराचार्यांच्या वतीने प्रसिद्ध झालेली अंत्यज वर्गविषयीची घोषणा पहावी! अंत्यज वर्गांना शिवणे हे देखील पाप असल्यामुळे त्या पापापासून या पापप्रणव प्राणिमात्रांचा बचाव करण्याच्या परम पवित्र उद्देशाने ही घोषणा परमहंस परिव्राजकाचार्य अ.अ.अ. याजकडून काढण्यात आली आहे. ती घोषणा अगदी नवीन असल्यामुळे तीत काही तरी नवीनच लिखाण असेल म्हणून आम्ही ती वाचू लागलो. तो त्यातील बहुतेक वाक्ये यापूर्वी कुठे तरी वाचल्याचे आम्हासं स्मरू लागले. विचारपरंपरा तर अगदी कोणत्या तरी जुन्या लेखातून चोरली असावी असा संशय येण्याइतकी परिचयाची भासली; पण ती पीठासारख्या अधिकारी संस्थेची घोषणा असल्याकारणाने ती कोणाची तरी चोरून केलेली प्रत असे म्हणण्याचे धाडस आमचे हृदय करीना. तेव्हा शारदा पीठासारख्याच मानसिक परिस्थितीत असलेल्या दुसऱ्या कोणा तरी तशाच थोर आणि दलितांवर केवळ दया करण्यासाठीच त्यांना दळून काढण्याचे पुण्यकृत्य करण्यात निर्ढावलेल्या दयाळू व्यक्तीने पूर्वी एखादी अशीच घोषणा काढली असावी, ती आपण वाचली असावी आणि ती जाणून बुजून प्रत करण्याचा हेतु नसताही मनुष्यत्व समान असल्याने समान मनःस्थितीत समान उद्‌गार सहज निघण्याच्या नैसर्गिक प्रवृत्तीमुळे त्या जुन्या घोषणेसारखीच विचारपरंपरा या नव्या घोषणेत उतरली असावी असा आमचा समज होऊन जुनी घोषणा आपण कुठे पाहिली आणि कुठे ठेवली ते आम्ही आमच्या स्मृतीतील हृदय-कपाटात शोधू लागलो.

काही वेळाने आम्हांस तो कागद सापडला. फार आंनद झाला. आमच्या कल्पनेप्रमाणे तीही एका थोर अधिकारसंपन्न संस्थेची घोषणाच होती. इतकेच काय, पण ही शारदापीठाची घोषणा जशी 'श्रीमद् राजराजेश्वर महाराज' याच्या वतीने होती, तशीच तीही अगदी थेट त्याच राजराजेश्वर महाराज याच थोर नावांस अलंकृत करणाऱ्या विभूतीची होती! ह्या ऐतिहासिक साम्याचे जसे आम्हांस कौतुक वाटले, तसेच वाचकांसही वाटेल या आशेने आम्ही त्या दोन्ही घोषणांतील महत्वाचा भाग बाजूस बाजू लावून छापीत आहो. या घोषणांपैकी शारदापीठाची घोषणा सध्या सर्वांसमोरच असल्याने तिचा उतारा जो आम्ही देत आहोत तो अक्षरशः खरा आहे किंवा नाही हे कोणासही परीक्षून पाहता येईल. केवळ अर्थ स्पष्टीकरणार्थ कंसामध्ये कुठे कुठे जी वाक्ये दिली आहेत. तेवढी आमची आहेत. बाकी आम्ही शारदापीठाची घोषणा जशीच्या तशीच दिली आहे. त्यातील अहिंदू शब्द देखील बदलले नाहीत; कारण न जाणो हिंदू शंकाराचार्यांचे लिखाणात म्लेंछ शब्द वापरणे हाही सनतान धर्मच असेल! दुसरी घोषणा जी आहे ती मात्र केवळ आमच्या कपाटात असलेल्या एका प्रतीवाचून बहुधा अनुपलब्धच झाली आहे. तरीही त्यातील लिखाण कुठेतरी

वाचलेले हजारो लोक विद्यमान असल्याने तिच्यातील वाक्यांच्या यथावत्पणाविषयीही शंकेस जागा उरणारी नाही. ही नवी घोषणा शंकराचार्य महाराजांच्या वतीने अंत्यज वर्गास सूचना म्हणून निघाली आहे. ती अगदी महाराजंच्या वतीने शंकराचार्यांसुद्धा झाडून साऱ्या भारतीयांसच आज्ञापत्र म्हणून निघालेली आहे. शंकराचार्य शारदापीठ हे केवळ महार चांभारांना अत्यंत अस्पृश्य म्हणून त्यांस ज्या त्यांच्या धर्माप्रमाणे राहण्याचा उपदेश देत आहेत, त्याच अंत्यज धर्माप्रमाणे राहण्याचा उपदेशही महाराज जॉनबुल यांची घोषणा शंकराचार्यांसुद्धा सर्व भारतीयांस अंत्यज, अस्पृश्य समजून हिंदी लोकांस देत आहे. त्या दोन्ही घोषणा अशा :

शंकराचार्य महाराज यांची धर्मनिष्ठ

भारतीय अस्पृश्य वर्गास सूचना

श्रीमद् परंमहंस परिव्राजकाचार्य जगद्‌गुरू श्रीशंकराचार्य शारदापीठाधीश्वर श्रीमद्राजराजेश्वराश्रम महाराज यांच्या वतीने अस्पृश्य वर्गास शुभ आशीर्वादपूर्ण सुचविण्यात येते की,-

१ थोड्या दिवसांपासून लोभलालचीचा वश होउन कित्येक धर्मद्रोही लोकांनी स्पर्शास्पर्श मर्यादा म्हणजे सृष्टीक्रमाप्रमाणे चालत आलेली प्रणालिका तोडून टाकून सब गोलंकार करण्याकरिता अत्यंजस्पर्श करण्याचा आणि अत्यंजांना उच्च वर्णीयांप्रमाणे देवमंदिर-प्रवेश अधिकार देऊन उच्चवर्णीय प्रजेला भ्रष्ट करण्याचा आपमतलबी आणि धर्मद्रोही यत्न चालविला आहे. या धर्मद्रोहाच्या वावटळीत तुम्ही अस्पृश्यांना सापडू नये.

२. तुम्ही अत्यंज भारतवर्षाचीच प्रजा आहात नि हिंदु जातीचे एक अंगही आहात. भारतीयांचा मुख्य धर्म (अर्थात् गावात कुत्रे चालजे तितके आम्हा स्पृश्यांशी लगटून मार्गाने न चालते तितके आम्हा स्पृश्यांशी लगटून मार्गाने न चालणे, म्हशी पाणी पितात त्या स्थळीही नदीचे पाणी न पिता त्याच्या अगदी खाली नदीला शिवणे, मुसलमान किटल्या धुतात आणि कुली पाणी पितात, त्या चवदार तळयाची चव चाखून तो भ्रष्ठ न करणे, आम्ही सर्व लाभकारक धंदे करीत असता तुम्ही गावच्या स्मशानाच्या पलिकडे एखाद्या खोपटातच राणे इत्यादी पवित्र धर्मसूत्रानुरुप) आपला धर्म पाळाल, तर त्यातच तुमचे कल्याण आहे.

३. ह्या नवीन धर्मद्रोही अत्यंजोद्धारक लोकांनी कधी तुम्हांस अन्नवस्त्र दिले आहे काय? (जसे आम्ही ग्रहण सुटले म्हणजे फाटक्या तुटक्या चिंध्या आणि सणावारास उष्ट्या पत्रावळी यांचे सनातनी दान तुम्हांस देतो) तुमचे ज्यामध्ये खरोखर कल्याण आहे असे त्यांनी काय केले आहे? (स्वामी श्रध्दानन्द, लाला लजपतराय, हिंदुसभा, यांच्या दलितोद्धार मंडळासारख्या संस्थांनी हजारो अस्पृश्यांस पोटापाण्यास लावले ही गोष्ट साफ खोटी आहे.) तुमचे ज्यामध्ये खरोखर कल्याण आहे त्यामध्ये आम्ही उच्च सनातनी लोक तुम्हांला सहाय्य करण्यासाठी सदोदित तयार आहोत. ते धर्मद्रोही पुढारी तुमचे खरे शत्रू होत. त्यांच्या वावटळीत सापडाल तर त्याचा परिणाम तुम्हांस मुंशीगंज-पर्वतीप्रमाणे भोगावा लागेल; मोठे कलह उत्पन्न होतील.

४. तेव्हा या धर्मद्रोही चळवळयांपासून सावध रहा. आपला अस्पृश्य धर्म पाळून रहाल, तरच परमेश्वर तुमच्यावर कृपा करून तुम्हांला पुढच्या जन्मी उच्च वर्णामध्ये जन्म देईल. (क्वचित जसा आजचा एखादा शंकराचार्य हा गेल्या जन्मीचा चांभार असू शकेल.- तसाच एखादा आजचा

महार पुढच्या जन्म उच्च वर्णीयांत जन्मून पुढचा शंकराचार्यही होऊ शकेल. याहून मेल्यानंतरचे आशादायी भविष्य ते काय असणार? म्हणून मरेतो या जन्मी कुत्र्याहूनही अस्पृश्यावस्थेतच आनंद मानून तोच धर्म मानून रहा.)

## जॉनबुल महाराज यांची
## राजनिष्ठ भारतीय प्रजावर्गास सूचना

श्रीमत्परमहंस (हंसाप्रमाणे अत्यंत गौरवर्ण असलेल्या) परिव्राजकाचार्य (चारी खंडात ज्यांच्या स्वारीचा सारखा संचार चालू आहे ते) आंग्ल द्वीपाधीश्वर, श्रीमद्राजराजेश्वर (तुमच्या शंकराचार्यांसुद्धा सर्व राजामहाराजांचे अधिराज) श्रीमत् जॉनबुल महाराज यांच्या वतीने आमच्या भारतीय पददलित प्रजाजनांस शुभ आशीर्वादपूर्वक आज्ञापिण्यात येते की-

१. थोड्या दिवसांपासून लोभलालचीचा वश होऊन कित्येक राजद्रोही लोकंनी (उदाहणार्थ टिळक, लजपतराय, चाफेकर, सावरकर, अरविंद,गांधी, गोखले इत्यादी मोठाल्या नोकऱ्या न मिळाल्यामुळे असंतुष्ट झालेल्या दुष्टांनी) राज-प्रजा मर्यादा म्हणजे ‘नाविष्णुः पृथिवीपतीः’ ही सृष्टिक्रमाप्रमाणे चालत आलेली प्रणालिका मोडून आम्ही गोरे इंग्रज पृथ्वीपती, तुम्हा काळ्या हिंदु लोकांचे राजे म्हणून विष्णूसारखे पूज्य; तुम्ही प्रजा म्हणूनच आमचे दास ही व्यवस्था भंगण्याचा आणि गोऱ्या इंग्रजांशी काळ्या हिंदी लोकांचा बरोबरीचा अधिकार सांगून सब गोलंकार करण्याचा आणि आमच्या राजमंदिरातून या हीनवर्णीय प्रजेस प्रवेशादिक अधिकर देऊन भ्रष्ट करण्याचा राजद्रोही प्रयत्न चालविला आहे. ह्या राजद्रोहाच्या वावटळीत तुम्ही आमच्या काळ्या हिंदी प्रजेने सापडू नये.

२. तुम्ही हिंदी लोक आमची प्रजा आहात आणि आमच्या ब्रिटिश साम्राज्याचे एक अंगही आहा. तुमच्या सनातन वर्णाश्रमधर्माप्रमाणे ह्या साम्राज्याचाही मुख्य धर्म वर्णाश्रमच म्हणजे **colour bar** हा आहे.

तुम्ही हिंदी काळे, दास, प्रजा आणि आम्ही इंग्रज गोरे, स्वामी, राजे. हा वर्णाश्रम धर्म तुम्ही पाळावा. (अर्थात् आम्ही फर्स्ट क्लासमध्ये असलो तर तुम्ही त्या डब्यात बरोबरीने न बसणे. रस्त्याने इंग्रज पाहताच त्यास सलाम करणे, वरिष्ठ गोरा ऑफिसर रागावला तर त्याच्या लाथा प्रसाद म्हणून खाणे, आम्ही गव्हर्नर इत्यादी अधिकार चालविणे आणि तुम्ही खर्डेघाशी, चपराशी, बबर्जी बनणे; ऑफिस वगैरेमध्ये नगरातून आम्ही बसणे आणि तुम्ही गावाबाहेर गचाळ ‘**Coloured area**’तच बसणे, शाळांतून ट्राम्वेतून, मार्गावरून आमच्या बरोबरीने न चालणे- त्या गोऱ्यांच्या मार्गास न विटाळणे, आम्ही तुम्हावरचे स्वार, तुम्ही आमचे भारवाही पशु : हा जो राजाप्रजासंबधीचा सृष्टिनियम तो आनंदाने पाळणे) हा तुमचा धर्म तुम्ही पाळाल तर त्यात तुमचे कल्याण आहे.

३. या नवीन राजद्रोही भारतोद्धारक म्हणविणाऱ्यांनी कधी तुम्हा हिंदी प्रजेस अन्नवस्त्र दिले आहे काय? त्यांची ही लबाडी उघडकीस यावी म्हणून तुमच्या कल्याणासाठीच आमच्या राज्यात आम्ही जवळ जवळ दरवर्षाआड मोठेमोठे दुष्काळ पाडून दाखवितो आणि तुम्ही काळे लोक लाखांनी अन्न

अन्न करून मरत असता आम्ही लाखांनी पगार उपटीत विलायतेस धाडतो. (हेतू हा की, तुम्हांस हे राजद्रोही भरपूर अन्नवस्त्र देतात की नाही याची कसोटी तुम्हास दाखवावी.) तुमचे ज्यामध्ये खरोखरच हित आहे (उदाहरणार्थ भाराभर कर बिनबोभाट देणे, हिंदुस्थानातील सोनेनाणे झाडून सारे विलायतेस वाहून नेऊ देणे, आमच्या शत्रूची दारू संपेतो त्यांच्या तोफांचे खाद्य बनणे) अशा कार्यी आम्ही उच्चवर्णीय '**White Races**' तुम्हांला मदत द्यावयास सिद्ध आहोत. हे टिळकादिक राजद्रोही पुढारीच तुमचे खरे शत्रू आहेत. त्यांच्या वावटळीत सापडाल तर त्याचा परिणाम (जालियनवाला बागेप्रमाणे) तुम्हांस भोगावा लागेल. मोठा कहर गुजरेल.

४. तेव्हा या राजद्रोही चळवळ्यांपासून तुम्ही सावध रहा. राज्यकर्ते इंग्रज ते विष्णू समजून प्रजेचा दासधर्म पाळून रहाल, तर परमेश्वर तुमच्यावर कृपा करून पुढच्या जन्मी इंग्रज जातीतच, क्वचित् इंग्लंडमध्ये तुम्हांस जन्म देईल. (न जाणो क्वचित् त्या मेल्यानंतरच्या पुढील जन्मी लॉर्डात जन्मून ब्रिटिश साम्राज्याचे मुख्य प्रधान व्हाल-नव्हे राजवाड्यात जन्मून राजे व्हाल- पुढील जन्मी मेल्यानंतर केवढे आशादायी भविष्य!) तेव्हा त्यावर दृष्टि ठेवून या जन्मी (मरेतो आमच्या पगाराची ओझी वाहणारी संतुष्ट गाढवे होऊन) प्रजाधर्माचे यथावत् पालन करा.

-दि. १४ डिसेंबर १९२९

## (२०)

# सर टेगार्टच्या दंड्याविरूद्ध चित्तागांगचा प्रतिदंडा

जिकडे पहावे तिकडे निर्बंधभंग चालेला आहे! हिंदी लोकंचा निर्बंधभंगाचा खेळ पाहता पाहता प्रत्यक्ष इंग्रज सरकारला देखील निर्बंधभ्ंगाच्या ह्या साथीत सामील होण्यावाचून राहवेनासे झाले.

इंग्रज सरकारच्या सर्व खेळाडूंत कलकत्त्याचे सर चार्लस टेगार्ट हे अत्यंत तडफदार खेळाडू म्हणून पूर्वीपासूनच प्रसिद्ध आहेत. तेव्हा या निर्बंधभंगाच्या खेळास अगदी रंग चढत असता त्यांस सगळ्यांचे आधी त्या उडी घ्यावीशी वाटावी आणि त्या उडीसरशी त्यांनी सगळ्या सरकारी आणि निमसरकारी खेळगड्यांवर ताण करावी हे साहजिकच होते.

बॅ. सेनगुप्त, सुभाषबाबू आणि मंडळी नुसत्या मिठाच्या निर्बंधाचा भंग करतात काय? तर चार्लस टेगार्ट म्हणाले, थांबा मी निर्बंध ग्रंथाचाच, उभ्या भारतीय दंडाविधानाचाच, इंडियन पीनल कोडाचाच, भंग करून टाकतो घ्या! असे म्हणून ते बाहेर पडले आणि नीट जे पहिले घरी दिसले, त्या सरस्वती छापखान्यात शिरून व्यवस्थापक मुखर्जी ह्यांच्या अंगाशी लगटले! मुखर्जींनी विचारले, ‘पण तुमच्यापाशी ‘वारंट’ आहे काय?’ सर टेगार्ट रागाने फणफणत ओरडले, चुप रहो! वारंट? हे बघ वारंट!!’

स्वतः त्या कलकत्त्याच्या पोलिस कमिशनरने मुखर्जी महाशयांच्या डोक्यावर आपला पोलिसी दंडा जोराने गरगर फिरवीत म्हटले, ‘हे बघ वारंट!’ याच्यापुढे ह्या दंडा-वारंटानेच सर्व कारभार चालणार!

आपल्या थोर थोर पुढाऱ्यांनी मिठाचा निर्बंधभंग केला तर सरकारच्या प्रत्यक्ष पोलिस कमिशनरनेच सगळ्या इंडियन पीनल कोडाचा आणि क्रि. प्रोसिजरचाच निर्बंधभंग करून टाकला! सरकार देखील महात्मा गांधींच्या चळवळीत सामिल झाले. आता मात्र निर्बंधभंगाच्या चळवळीस विरोध असा कोणाचाच राहिला नाही. दंडा हेच वारंट! गायीत जशा हिंदूंच्या तेहतीस कोटी देवता शिरून बसतात तशा या एक्या ‘दंड्यात’ इंग्रजांचे तेहतीस कोटी निर्बंध घुसून सामवले जातात. आता अमके कलम आणि अमके कोड आणि अमका छेदक हे पाठ करावयास नको; एक शब्द ध्यानात ठेवला की पुरे- दंडा! दंडा हाच निर्बंध, हाच नियम, हीच नीती, हाच धर्म- हेच वारंट! दंडा : इंग्रजी कारभाराचे सगळे मर्म एका शब्दात येते; पण जो शब्द आजवर एखाद्या गुरूमंत्रासारखा गुप्त राखल्यामुळे मूर्ख लोक त्या इंग्रजी सत्तेची घटनासूत्रे पीनल कोडादी पन्नास कोडांत धुंडीत बसत असत, तो शब्द सर टेगार्टने स्पष्टपणे एकदाचा सांगून टाकला हे फार उत्तम झाले- दंडा! यात इंग्रजांच्या शक्तीचे सारे मर्म आले. ‘दंडा’ हेच इंग्रजी अस्तित्वाचे वारंट! - आणि ‘सँक्शन’ हि!!!

‘होय ना? तर मग ‘चित्तागांगचे क्रांतिकारक म्हणाले, ‘दंडा तर दंडा’ निर्बंधनियम, भयभीती, चालचलणूक, सारी पायाखाली तुडवून इंग्रजी सत्तेच्या ह्या ‘चूप रहो! दंडा हेच वारंट!’ म्हणून

दिलेल्या आव्हानासरशी दंड थोपटून चित्तागंगच्या क्रांतिकारकांनीही प्रत्याव्हान दिले- ‘चूप राहत नाही! तुझ्या त्या दंड्यास हे घे प्रति दंडा! तुलाच दंड आहेत आणि आम्हांस नाहीत की काय! तुम्ही कागदी वारंटे नाचवित होता तोवर त्या तालावर आम्हीही निर्बंधभंगाची गाणी गात मिरवत होतो. पण आता जर तुम्ही हे बघ वारंट म्हणून आमचे डोक्यावर दंडा फिरवू पाहत असाल, तर आम्हीही पण त्या निर्बंधभंगाची ललित गीते संपवून हे प्राणभंगाच्या रणगीताचे पहिले टिपरू मारले बघ!’ जणू असे म्हणत ते उग्र क्रांतिकारक कोणास काही पत्ता देखील नसता एकाएकी चित्तागंगला प्राणभंगाची भयंकर खळबळ उडवून देते झाले!

ते प्राणभंगाची चळवळ करू निघालेले लोक सारे मूठभर होते. पराकाष्ठा शंभर असतील नसतील. पण या मूठभर प्राणभंगाच्या गर्जनेने निर्बंधभंगाच्या मैलभर पसरलेल्या हजारो मिरवणुकीच्या स्वाहाकारांनी, हाहाकारानी किंवा जयजयकारांनी राजकीय वातावरण जितके कधीही हादरून गेले नाही तितके हादरून दिले. कारण त्या कठोर हृदयांनी स्वातंत्र्य-मीठ टाकून एकदम स्वातंत्र्य पिस्तुलेच मुठीत धरली. एकदम प्राणाशीच गाठ घातली.

ती शुक्रवारची रात्र होती. त्यातही तो शुक्रवार ‘चांगला शुक्रवार’! गुडफ्रायडे! इंग्रजी अधिकारी सुटीची आणि सणाची मजा मारीत होते. इतक्यात रात्रीचा काळोख एकदम चमकून उठला! क्रांतिकारकांनी तीन तुकड्या करून एकीने टेलिफोन एक्सचेंज कापून टाकला आणि पेट्रोल ओतून आग लावली. ढाक्क्याची आणि कलकत्त्याची रेल्वे यांचा संबंध तोडून दूर अंतरावरील रूळ उखडून टाकले. मालगाडी रूळाखाली ओढून गाडीमार्ग सगळा बंद केला. दुसऱ्या तुकडीने आसाम बंगाल रेल्वे अधिकाऱ्यांवर हल्ला चढवून बंदूकीच्या दस्त्याने त्याचे शिर ठेचून ठार मारले. नंतर त्या स्टेशनलाही आग लावून त्यातील बंदुका आणि दारू छिनली.

तिसऱ्या तुकडीने तर राखीव पोलिसांच्या छावणीवरच छापा घातला. इंग्रज सार्जट आदिक पहारेकऱ्यांना धडाक्यासरशी एकदम मारून टाकले ते शस्त्रागारात घुसले आणि नेता येतील तितक्या बंदुका, दारूगोळ्या अत्यादि शस्त्रांची लूट करू त्यांनी नेता येईना त्या दारूगोळ्यास आग लावून दिली.

इतका सगळा भयंकर प्रकार झाल्यावर मॅजिस्ट्रेटसाहेब मोटारीतून बंदोबस्तास निघाले. पण मार्गातच त्यांचाच बंदोबस्त केला गेला. क्रांतिकारकांनी त्यांचीच मोटार अडवून गोळ्या झाडून गाडीहाक्यास घायाळ केले, शिपाई ठार केले- मॅजिस्ट्रेट मात्र मोठ्या कष्टाने जीव घेऊन निसटू शकले.

अशा रितीने बंड करून आणि शस्त्रे लूटून ते शंभर जणांचे पथम शेजारच्या दुर्गम पहाडात घुसून सुखरूपपणे नाहीसे झाले!!

चांगल्या शुक्रवारची रात्र चटगावच्या इंग्रजांना आणि इंग्रजी सत्तेला अशी वाईट गेली! सिंहांचे, ज्या नखांनी नि दातांनी भय वाटावयाचे त्या त्याच्या नखा-दातांनाच हात घालून ज्या क्रांतिकारकांनी उपटून काढले, त्यांना त्या सिंहाच्या शेपटाचे भय थोडेच वाटणार? शस्त्रागारालाच क्रांतिकारकांनी लुटून टाकले. इंग्रजांचीच शस्त्रे छिनावून इंग्रजांची कत्तल केली! जूता भी उसका और सीर भी उसका!! सर टेगार्टने मुखर्जीच्या डोक्यावर जो दंडा गरगर फिरवून म्हटले,’हे बघ

वारंट!' तोच दंडा चटगावला क्रांतिकारंनी टेगार्टच्या इंग्रजी भाईबंदांचे डोक्यात हाणून म्हटले, 'हे बघ मरण!'

कलकत्त्याला आणि कराचीलाही गेल्या महिन्यातच दंगे झाले. पण ते दंगे होते. हजारो लोक बेतबीत नसता पोलिसांच्या आणि सरकारच्या तत्कालच्या दडपशाहीने तत्काळ उत्क्षुब्ध होऊन ती मारहाण झाली. तरी देखील त्यात जो नेमका इंग्रजांवर मार पडला आणि भारतीय पुढाऱ्यांवरच ज्या नेमक्या गोळ्या झाडल्या गेल्या, त्यामुळे निर्बंधभंगाचे पाऊल आपण होऊन प्राणभंगाकडे पडू लागले. परंतु या चित्तागांगचा प्रकार तसा नसून येथे जाणून बुजून क्रांतिकारकांनी इंग्रजी सत्तेवर चढाई केली. सत्तावनच्या स्वातंत्र्यसंग्रामाच्या इतिहासाचे फाडून नेलेले ते एक पान होते. तो दंगा नव्हता; तो कोणा बंडाच्या उठावणीचा हुंकार होता.

कारण सत्तावान साली प्रत्येक केंद्राचा हाच कार्यक्रम ठरलेलर असे. अकस्मात् टपाल, तार, रेल तोडून दळणवळण बंद पाडणे , इंग्रजी सत्ताधाऱ्यांवर छापा, स्थानिक अधिकाऱ्याला तत्काल मारणे, शस्त्रागारावर अधिकार आणि क्रांतिकारकांच्या जयाची द्वाही फिरविणे, हाच कार्यक्रम तंतोतंत अगदी घड्याळासारखा पार पाडला गेला. एक गोष्ट  उरली- सत्तावन साली सैनिक आणि पोलिस क्रांतिकारकांत प्रथम गुप्त रीतीने मिळून असत आणि उठावणी होताच प्रकटपणे त्यांच्यात मिसळून जात! आणि त्याहूनही महत्वाचा जो फरक ह्या बंडाच्या स्थानिक अभिनयात आणि सत्तावन्नच्या प्रचंड प्रयोगात उरला तो हा की, त्या क्रांतिकारकांचा तो प्रचंड प्रयोग एकदम सर्वत्रच सुरू झाला होता. एकट दुकट उठावणी नव्हे तर सार्वत्रिक उत्थान! सर्वव्यापी उठाव! या दोन गोष्टी सोडल्या तर चित्तागांगची उठावणी सत्तावनच्या पूर्वनिश्चित आणि आक्रमणशील स्थानिक कार्यक्रमाची पूरी पूरी बजावणी होती. क्वचित् आगामी वादळाची पूर्व सूचना होती.

आणि म्हणूनच गव्हर्नर जनरल, गव्हर्नर, कलेक्टर, मॅजिस्ट्रेट, फार काय आमचे महात्मा गांधी देखील ह्या चित्तगांगच्या क्रांतिकारक हुंकारासरशी अकस्मात चमकून, दचकून चिडून गेले! नाही तर इकडे लाख लाख लोक जशी चळवळीची मौज करीत होते, मिरवणुकी, मिठाच्या मुठी, पोलिसांची गंमत, हडताळी बातम्या की, आज अमक्याला पोलिसांनी बोचकारले, तमक्या स्वातंत्र्यवीराला दोन महिने शिक्षा झाली, अमक्या देशवीराला तीन दिवस; सरकार आणि लोक दोघेही त्या चळवळीत कसे दंग झाले होते. पण तो सारा रंग ह्या चित्तागांगच्या मूठभर शंभरांनी साफ बिघडवून टाकला! चळवळीच्या खेळात असे चिरडीवर कोण येते का? त्या क्रांतिकारकांना खेळ म्हणून खेळताच येत नाही. एकदम एकेरीची बात! त्यामुळेच जसे इंग्रजांचे आमच्याशी पटते तसे त्यांच्याशी पटत नाही!

आणि म्हणूनच आमची इंग्रज सरकारला आणि लोकांना अशा साग्रह सूचना आहे की, अशा चिडक्या आणि एकेरीवर येणाऱ्या ह्या लोकांचा वेळीच नीट बंदोबस्त करावा. चित्तागांगचा हा क्रांतिकारक हल्ला त्यामागे इतका गाजावाजा झालेल्या चौरीचौऱ्याच्या दंग्याहूनही किती तरी भयंकर अर्थाने भरलेला आहे. त्यांतील स्वारस्य वेळीच ओळखावे. विशेषतः इंग्रज सरकारने प्रत्येक ठिकाणी चित्तागांगची पुनरावृत्ती होण्याचे आधीच काही तरी मिटते घ्यावे.

गांधीजींनी चित्तागांगच्या या भयंकर उठावणीला दोन-चार शिव्या हासडून आज्ञा सोडली आहे की, माझ्या चळवळीत अहिंसेचे धोरण म्हणून न पाळणाऱ्यांनी पडू नये, बाजूस रहावे. गांधीजींचे डोळे चौरीचौऱ्याच्या वेळेपासून अजूनपर्यंत उघडू नयेत ही आश्चर्यकारक गोष्ट आहे! अजून तरी त्यांनी ध्यानात आणावे की, एकदा एखादे प्रचंड राष्ट्रीय वादळ उत्पन्न झाले की, त्यास कोणा बार्डोलीच्या बोळक्यात 'माझ्या' नियमाचे बुचाखाली दाबून ठेवणे शक्य नसते.

महात्माजी! ही जी चळवळ चालली आहे ना, ती एका उभ्या क्रुद्ध राष्ट्राच्या उत्थापनासरशी होणाऱ्या हुंकाराचा प्रतिध्वनी आहे. ती माझी चळवळ नाही, ती तुझी नाही; ती भारताच्या युगायुगांच्या संचित पापपुण्याची, जयपराजयांची, मानापमानाची, एकत्रित अशा कोटी कोटी जीवांच्या तळमळीसरशी उत्क्षुब्ध झालेल्या महाकालीची, प्रलयकारी क्रांती आहे. तीत 'माझा', 'तुझा', 'त्याचा'- चा सगळ्यांचा भाग आहे. पण तिचे भाग्य, विधी, विधान आणि नियंत्रण हे 'माझ्या', 'तुझ्या', 'त्यांच्या' कोणाच्याच हाती नसून त्या महाकालीच्या अति-मानुष इच्छेवर अवलंबून आहे. क्रांतिकाराकंस बाजूस रहा, हे सांगणारे तुम्ही कोण? आम्ही कोण? हे राष्ट्र सगळ्यांचे आहे. त्यांच्या दास्याच्या बेड्या तोडण्यासाठी उत्कंठा तुम्हांहूनही त्यांस अधिक उत्कुटपणे लागली आहे. त्या बेड्या तुम्ही दर्भाने तोडू पाहतात, आम्ही त्या काठीने तोडू पाहतो, त्या घणाने तोडू पाहतो. त्या बेड्या तोडून ही भारतभूमी स्वतंत्र करण्यासाठी झटण्याचा आणि झुंजण्याचा अधिकार प्रत्येकाचा आहे. त्यास कोण कोणास म्हणणार बाजूस रहा! तेव्हा हे असे होणारच असे गृहीत धरूनच आम्ही सर्वांनी त्या क्रांतीस तोंड दिले पाहिजे. आता यापुढे तरी अशा भलत्या आज्ञा, भलत्या अपेक्षा, धरू नयेत.

यासाठीच आम्ही पूर्वी एका अंकी क्रांतिकारक पक्ष तीन वर्षे चूप बसणार आहे म्हणून धाडलेल्या कोण्या कर्नल बीडच्या पत्रासरशी जे हुरळून गेले होते, त्यांस चेतावणी दिली होती! तीन वर्षे काय पण तीन आठवडे झाले नाहीत तोच कलकत्त्याचा दंगा झाला, कराचीचा झाला आणि चित्तागांगचा हा क्रांतिकारक छापा तर उभ्या हिंदुस्थानासच नव्हे तर उभ्या इंग्रजांसही तेच पुनः 'बहिऱ्यास ऐकू जावे' इतक्या मोठ्याने बजावून सांगत आहे की, क्रांतिकारक जिवंत आहेत, वाढत आहेत आणि क्रांति यशस्वी झाल्यावाचून ते नाहीसे होण्याचे काहीच चिन्ह दिसत नाही. यास्तव ती क्रांति शक्य तो सामोपचाराने इंग्रजाने नि आम्ही मिळून घडवून आणावी हेच योग्य आहे- अजूनही शक्य आहे. या उपर भवितव्यता बलीयसी!

पण ती भवितव्यता काहीही असली तरी आणि अगदी आजच जरी स्वातंत्र्याचे पार्सल इंग्लंडने धाडून दिले, तरीही ते स्वातंत्र्य विनारक्तपात आणि विनाशस्त्राघात मिळाले असे म्हणण्यास आजही कोणासच तोंड उरलेले नाही. कारण रक्तारक्ती आणि शस्त्राशस्त्री आज वीस वर्षे तरी सारखी चालू आहे. आणि सर टेगार्टचा दंडा आणि हा चित्तागांगचा प्रतिदंडा ही तिच्या अगदी अद्यावत् '**up-to-date**' अस्तित्वाची ताजी बातमी आहे!

-दि. ३ मे १९३०

## (२१)

# ही सुडाची ब्याद किंवा हत्येची ब्याद

लाहोरला सॉंडर्स या नावाच्या एका असी.पोलिस सुपरिटेंडेटला कोणी गोळी घालून मारले आणि ते कृत्य लालाजींच्या हत्येचा सूड म्हणून करण्यात आले असा संशय सर्व जगास येत आहे ही गोष्ट आता सर्वप्रसिद्ध झालेलीच आहे. लालाजींवर सायमनच्या बहिष्कार-प्रदर्शक मिरवणुकीत जो अत्याचारी मार पोलिसांकडून पडला, त्याप्रसंगी सॉंडर्स हा तिथे अधिकारी म्हणून उपस्थित होता आणि अर्थातच त्या दंगलीत त्याचाही हात होता हीही गोष्ट अनेक पत्रांतून प्रसिद्ध झालेली आहे.

लालाजींनी स्वतः हाती छडी देखील घेतली नव्हती; इतकेच नव्हे तर मिरवणुकीत इतर काही लोकांच्या हातांत लाठ्या होत्या, त्याही वेचून वेचून त्यांनी काढून घेतल्या आणि अशा लाठीशून्य समाजासह लाठीबाज, बंदुकबाज, बेयोनेटबाज पोलिसांस तोंड दिले. कारण अहिंसात्मक सत्याग्रहाच्या व्याख्येच्या चौकटीत ती मिरवणुक चपखल बसावी. तशी ती बसलीही आणि बिनलाठी जेव्हा लाठीशी तोंड देऊ निघते, तेव्हा जो ह्या अलौकिक युद्धकलेचा लौकिक परिणाम व्हावयाचाच तो शेवटी निरपवादपणे झालाही. लाठीने बिनलाठीची छाती पहिल्या तडाख्यासरशी तडकविली; मिरवणूक उधळविली गेली; लालाजी घायाळ झाले; पोलिसांची पाठ सरकारने थोपटली; आमची पाठ सरकारी लाठ्यांनी सडकून निघाली.

पुढे लालाजींचा अकस्मात् देहान्त झाला. लोक म्हणाले, लालाजी लाठीच्या घावास बळी पडले. सरकार म्हणाले, नाही; आणि पडले असले तरी 'शांतता आणि निर्बंध' तोडू पाहणाऱ्यांचा बंदोबस्त करीत असता तसे झाले तर तो आमचा दोष नाही. लोकांनी लालाजींच्या प्रेताची प्रचंड मिरवणुक काढली. लोकांनी लालाजींचे सुतक पाळले. पण सरकारास त्यामुळे दुःख होण्याचे काही एक कारण आढळले नाही लोकांनी दारे दुकाने दुःखाने बंद केली. सरकारी ऑफिसे नेहमीप्रमाणे डोळ्यांच्या खिडक्या उघडून शोकयात्रा, ते सुतक तो हरताळ यांची गंमत पाहत उभी राहिली.

इतक्यात त्या लालाजींवर लाठ्या चालविणाऱ्या पोलिस तुकडीतील एक वरिष्ठ अधिकारी सॉंडर्स हा एका निरभ्र सकाळी ऑफिसबाहेर आला. त्याच्या मनात सायकलवर बसावे असे आले. तो सायकलवर बसला. तोच दुसऱ्या एकाच्या मनात पिस्तुल झाडावेसे आले. त्याने गोळ्या झाडल्या आणि सॉंडर्स तत्काळ गतप्राण होऊन धाडदिशी खाली पडला.

लाठीच्या मारानंतर काही दिवसांनी लालाजी मेले. तेव्हा ते लाठीने मेले नसावेत ही शंका सरकारास येणे साहजिक होते. पण गोळी लागताच सॉंडर्स मेला तेव्हा तो गोळीनेच मेला हे निःशंक होते, म्हणून सरकारास तत्काळ दुःख झाले. अशा वेळी कोणाही सहृदय मनुष्यासस दुःख होतेच आणि सरकार सहृदय आहेच.

लालाजी मेले तेव्हा लोकांनी त्यांची शोकयात्रा काढली; पण सॉंडर्स मेले तेव्हा शोकयात्रा काढण्याचा प्रसंग स्वतः सरकारवरच आला. लालाजी मेले तेव्हा लोकांनी घरेदारे बंद करून दुःखाचा

हरताळ पाडला. आता सरकारवर आपली ऑफिसे बंद करून शोकप्रदर्शन करण्याचा दुःखद प्रसंग आला. लालाजी पंजाबचे पुढारी; पण त्यांच्या प्रेतयात्रेस शोकवेषात उपस्थित राहण्याची गव्हर्नरास काही आवश्यकता दिसली नाही. पण सॉंडर्स प्रेतयात्रेस गव्हर्नरसुद्धा झाडून सारे अधिकारी उपस्थित होते. लालाजींसाठी लोकांना सुतकी व्हावे लागले, तर सॉंडर्ससाठी सरकारलाही व्हावे लागले. वास्तविक सरकार ही सार्वजनिक संस्था- तिला लालाजींच्या आणि सॉंडर्सच्या दोघांच्याहीवर गुदरलेल्या संकटात समदुःखी व्हावयास पाहिजे होते. पण लालाजींच्या प्रेतयात्रेस वीस-तीस हजार लोकंची दाटी झाली असताही ह्या सार्वजनिक दुःख प्रदर्शनार्थ सार्वजनिक पैशाने विकत घेतलेला दारूगोळा उडवून त्यांस विदायवंदनेची **Last Post** ची फैर झाडली नाही आणि ज्या सॉंडर्सच्या प्रेतयात्रेस अधिकात अधिक दोन हजार लोक नव्हते त्याला एकट्यालाच ती विदायवंदना तोफांच्या सैनिक सन्मानासह देण्यात आली.

त्यातल्या त्यात आनंदाची गोष्ट इतकीच की, लोकांच्या पुढाऱ्यांनी मात्र आपले कर्तव्य चोख बजाविले. त्यांनी लालाजींच्या वरील अत्याचाराच्या प्रतिध्वनीचाही जोराने निषेध केला. त्यांनी सरकारप्रमाणे एककल्लीपणा न करता लालाजींचेही सुतक पाळले आणि सॉंडर्सचेही पाळले : 'ब्राम्हणे गवि हस्तिनि शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः।'

आणि पंडितांची समान बुद्धि जे निःपक्षपाती दुःख करू शकते, त्याहून काही तरी विलक्षण असे दुःख महात्म्यांच्या बुद्धिला झाले नाही तर मग महात्म्यांची बुद्धि ती काय राहिली!

यास्तव तुम्हा आम्हा सर्वांना सॉंडर्सच्या प्रकरणाविषयी जे दुःख वाटते त्याहून शतपट दुःख महात्मा गांधीना होणार हे अपेक्षितच होते आणि तसेच झाले. त्या बिचाऱ्या महात्म्याचा आत्मा त्या दुष्ट वार्तेमुळे तळमळून गेला! 'ही सूडाची ब्याद' किंवा 'ही हत्येची ब्याद' **This curse of assassination** नावांचा जो एक लेख त्यांनी 'यंग इंडिया'त लिहिला आहे, त्यात त्यांच्या आत्म्यास झालेले हे तीव्र दुःख त्यांनी शक्य तितके ओकून टाकण्याचा प्रयत्न केला आहे. तरीही ते सर्व बाहेर न पडता पोटातल्या पोटात अजून किती तरी मळमळत असले पाहिजे. त्यांच्या इंग्लिश मथळ्याचा सर्व अर्थ भाषांतरात चुकू नये म्हणून आम्ही त्यांचे दुहेरी भाषांतर केले आहे.

महात्माजींच्या सॉंडर्सच्या हत्येविषयी झालेल्या तीव्र दुःखाची जर कोणास कल्पना करावयाची असेल, तर ती या एका गोष्टीने देखील स्पष्ट होईल की, स्वामी श्रद्धानंदांच्या वेळेस देखील 'हत्येच्या ब्यादी' ची इतकी चीड त्यांच्या लेखातून प्रकट झाली नव्हती. सहा मारले गेले; पशूसारखा त्यांचा देह बडवून चुरडला गेला. पण् गांधीजींच्या स्थितप्रज्ञतेची एकही किंकाळी त्या वेळी कोणास ऐकू आली नाही. मलबारच्या हत्याकांडाचे हालहल देखील ब्र न काढता त्या स्थितप्रज्ञतेने पचवून टाकिले. एका अश्रूने देखील 'यंग इंडिया'चे पान भिजू दिले नाही. पण ती स्थितप्रज्ञता सॉंडर्सच्या हत्येची बातमी ऐकताच आम्हा प्राकृत जनांपेक्षाही विव्हल होऊन दुःखाश्रूत बुडून गेली. इतके ते कृत्य दुष्टपणाचे होते! काय सांगावे!!

ह्या दुःखाच्या उद्रेकासरशी महात्माजींना ह्या शोचनीय घटनेतील इतरांस न दिसलेली अनेक हृद्गते व्यक्त झाली आहेत. कोणाच्याही ध्यानात न आलेली पहिली महत्वाची गोष्ट जी महात्माजींनी ह्या लेखाच्या पहिल्या वाक्यात सांगून टाकली ती ही की, ते कृत्य अत्यंत

भ्याडपणाचे होते. '**It was a dastardly act**' होते का? यापूर्वी कोणाच्या ध्यानात आले हे? हिंदु पत्रे तर काय, हिंदुच ती. पण मुसलमानी पत्रांतून बऱ्याच वाईट धाडसी कृत्यांविषयी यथेच्छ अनुभव असणाऱ्या मुसलमानी लोकांनीही त्या कृत्यात जे निधडे साहस दिसून आले ते पाहून तोंडात बोट घातले होते. फार काय इंग्रजी पत्रांनी देखील ज्या उग्र आणि कठोर अविचल धैर्याने तो तरुण हे भयंकर कृत्य करून पाठलागाची लांडगेतोड होत असता खिशात हात घालून गंभीरपणे निघून गेला त्याचा उल्लेख केल्यावाचून राहिली नाहीत! ह्या घटनेस तुम्ही आम्ही सर्वांनी कोणी शोचनीय म्हणून म्हटले; कोणी निंद्य म्हणून म्हटले, कोणी आततायी म्हणून म्हटले- पण त्यात साहसाचा, धैर्याचा लवलेशही नव्हता इतकेच नव्हे तर ते कृत्य अगदी भ्याडपणाचे होते आणि ते करणारा कोणी भागूबाईच होता ही गोष्ट इंग्रजी पत्रांच्याही ध्यानात आली नाही! पण गांधीजींनी कसे ओळखले '**Dastardly!**' दुसरे काय!

कोणी म्हणतील गांधीजींना अत्याचाराच्या म्हणून वाटणाऱ्या कृत्यात धैर्य असूच शकत नाही अस वाटत असावे. अत्याचारास आततायीपणा आणि धाडस ह्या निरनिराळ्या बाजू असू शकतात हे गांधीजींस कळत नसल्यामुळे त्यांनी त्यास भ्याड म्हटले आणि धैर्य, साहस, शौर्य इत्यादी गुण ज्यांच्या नित्य परिचयाचे आहेत त्या इंग्रजासंच त्यांनी चटकन पारख झाली. पण धाडस कसे ओळखावे हे गांधीजींस समजत नाही असे समजणे हा त्यांचा अपमान करणे आहे. कारण मलबारमध्ये जेव्हा मोपल्यांनी अत्याचारांची दंगल उडवून दिली आणि सूड म्हणून नव्हे तर धर्म म्हणून, निरुपद्रव्यांसही उपद्रव दिली तेव्हा त्या अत्याचाराकडेही दुर्लक्ष करण्याइतके त्यांच्या धाडसाने आणि शौर्याने गांधींजीस विमोहित केले होते. याच 'यंग इंडिया'त त्यांनी त्या मोपल्यांस ^**My brave Mopla brothers** म्हणून उलट गौरविले होते! तेव्हा गांधीजींस **Brave** कोणाला म्हणावे हे चांगले कळते. पण तरीही ते मोपल्यांसच शूर म्हणतात. अर्थात् अत्याचारी मोपलेच शूर आहेत आणि हा सॉंडर्सला मारणारा अत्याचारीच कोणी भागूबाई आहे, **Dastardly!** दुसरे काय!

असेही म्हणता येत नाही की गांधींजी अत्याचाराविषयीच्या क्रोधाने असे काही तरी लिहून गेले. कारण श्रद्धानंदांच्या हत्येमुळे सर्व हिंदुसमाज क्रुद्ध झाला असताही ह्या हिंदु महात्म्याने शांत वृत्ती ठेवून त्या हत्याऱ्यास 'भाई अब्दुल रशीद!' म्हणून संबोधिले आणि हिंदूंना सांगितले की, त्याची फाशी रद्द करण्याचा हट्ट धरा! हिंदु श्रध्दानंद मारले गेले असता इतके निर्विकार राहणारे गृहस्थ इंग्लिश सॉंडर्स मारला जाताच जे बोलले ते विचारानेच बोलले असले पाहिजेत. **Dastrardly!** अगदी असेच!

बरे, हा लेख त्यांच्यासाठी कोणी उपसंपादकाने खरडला असेही दिसत नाही. कारण त्यांच्यावाचून कोणालीही न साधणारी वदतो व्याघाताची मुद्रा त्या लेखास त्यांच्या इतर लेखांप्रमाणेच ढळढळीतपणे भूषवीत आहे. कारण त्या कृत्यास **Dastardly** भागूबाईपणाचे कृत्य म्हणून ते लगेच पुढे सांगतात की, अशा कृत्यास जी लोकांची गुप्त सहानुभूती मिळते ती त्या कृत्यात जे निधडे धाडस प्रकट होते त्यामुळे मिळते! 'पाश्चात्य लोकांतील लुटारू, चाचे, दरवडेखोर यांची धाडसाची कृत्ये वाचण्याची चटक आम्हासही लागल्यामुळे जिथे कुठे धाडस आणि निधडे शौर्य दिसेल तिथे तिथे त्याचा हेतू काय इकडे न पाहता आम्ही चटकन त्यांची वीरपुरूषाप्रमाणेच मान्यता करतो! ही

सवय चांगली नाही! लोकांमध्ये सॉंडर्सला ठार करणाऱ्याच्या धाडसामुळेच अशा कृत्याविषयी सहानुभूती आणि गुप्त आदर उत्पन्न होत आहे याचे हे तात्विक कारण म्हणून गांधीजींनी दिले आहे. अर्थात त्या 'भागूबाईपण'च्या कृत्यात 'निधडे धाडस' होते असा त्यांच्या लेखाचा मथितार्थ निघतो.

आहे की नाही वदतो व्याघाताचे हे उत्कृष्ट उदाहरण! भ्याडपणाचे कृत्यात निधडे धाडस प्रकट होते! निधडे धाडस हा भागूबाईपणा! **Dastradly!** दुसरे काय!

परंतु नुसत्या धाडसाने मोहून जाण्याची चटक लोकांस लागली म्हणावे तर ज्या युरोपियन चाचे, लुटारू, दरवडेखोर यांची उदाहरणे गांधीजींनी संकेतली आहेत, त्यांपैकी एकाचेही नाव कोणाच्या तोंडी आलेले आढळत नाही; फार तर काय परंतु हिंदुस्थानातील तुरुंगातूनही एकेकाने दहा-दहा सशस्त्र दरवडे मारलेले अधम भरलेले असतात. पण त्यांची चित्रे लोकांच्या भिंतीवर काही आढळत नाहीत! भले वीर म्हणून त्यांस पाहताच त्यांची पाठ कोणी थोपटीत नाही!

ही पुढील बातमी पहा, 'दि. ३ रोजी पुण्याच्या लॉ कॉलेजातील कुर्लेकर नावाच्या विद्यार्थ्याने भांबुड्यार्जवळ रेल्वेवर पडून गाडीच्या चाकाखाली जीव दिला. आता केवळ प्राण देण्याच्याच धाडसाचा प्रश्न असेल तर हे धाडसाच आहे. पण ह्याविषयी कोणी अग्रलेख लिहिले नाहीत. त्याची वाहवा करणारी गुप्तपत्रके छापली नाहीत. मग सॉंडर्सच्या कत्तलीतील धाडसच तेवढे लोकांस का आकर्षिते? असे गांधीजी म्हणतात हो, आम्ही नाही!

कारण गांधीजी स्पष्टच म्हणतात की, आता देशातील वातावरणात पुनः एकदा अत्याचाराचे वारे संचरले आहे- **Violence is in the air!** आम्हास तसे फारसे आढळत नाही आणि आज आठ वर्षे अहिंसात्मक अनत्याचाराच्या गर्जनेने गुदमरून गेलेल्या ह्या देशाच्या वातावरणात जर पुन्हा खरोखरच अत्याचाराचे प्रतिकारी ध्वनी उठत असतील तर हा गांधींजींचे वर्चस्व फोल झाल्याचाच पुरावा नव्हे काय!

मारेकरी काहीही म्हणोत, ऐकोत न ऐकोत. पण त्यास चार उपदेशाचे शब्द सांगून शुद्धीवर आणणे हे आपणा सर्व शांत, शिष्ट, सोसाळू, राजनिष्ठ प्रजाजनांचं कर्तव्य आहे. आपणांस तो उपदेश देण्याचा अधिकार नसेल तर दुसऱ्या कोणास असणार? गांधीजींचा अधिकार तर शिवाजी, प्रताप, श्रीकृष्ण ह्यांसही उपदेश देण्याचा आहे, असे ते स्वमुखानेच सांगत आले आहेत; म्हणून मारेकऱ्यांना हितावह नव्हे तर तुम्हा आम्हांसही हितावह असा आणखी एक लाखाचा बोल ते त्या लेखात बोलतात की पोलिस अधिकाऱ्याचे त्या वेळेचे वर्तन अगदी निरुपद्रवी होते. **The innocent police officer discharged his duty, however disagreeable its consequence may be for the community to which the assassin belongs-** ज्या समाजात तो मारेकरी निपजला त्या समाजाला न पटणारे परिणाम जरी त्या पोलिस ऑफिसरच्या कृत्याने घडले असले तरी देखील त्या निरुपद्रवी पोलिसांचे ते वर्तन हे त्याचे कर्तव्यच होते.

कळले ना आता सर्वांना? हेच विधेय जवळजवळ ह्याच शब्दात पार्लमेंटात इंग्रजी अधिकाऱ्यांनी सांगितले होते. पण त्या वेळेस लोकांस ते पटले नाही. पोलिसांनी त्या प्रसंगी अत्याचाराचे वर्तन केले असेच बहुतेक पत्रकर्तेही म्हणत. मारेकऱ्यांची तर गोष्टच निराळी ते लोक गांधींजींच्या 'त्यांचे ते

कर्तव्यच होते; मग परकियांस त्याचा परिणाम कितीही अप्रिय वाटो' ह्या वाक्यातील हाच न्याय स्वतःचेही समर्थन करण्यास उपयोजिल्यावाचून राहणार नाही. पण आपणा अमारेकरी शिष्टांनी तरी आता त्या लाहोरच्या निरुपद्रवी कर्तव्यरत पोलिसांविषयी आपली कल्पना बदलली पाहिजे. गांधींजीच्या लेखाचा अर्थ ध्यानात धरला पाहिजे **Dastradly!** ह्या एका शब्दात ते सर्व काही येते.

परंतु तरीही एक विधेय मात्र त्या लेखाच्या सारांशाहूनही निराळे उल्लेखिलेच पाहीजे इतके ते विशिष्ट महत्वाचे आहे. 'माणसाचा काय दोष? हा पद्धतीचा दोष आहे! **Whatever the Assistant superintendent did was done in obedience to instructions. No one person can be held wholly responsible for the assault and the aftermath. The fault is that of the Government system. What requires mending is not men but the system.** लालाजींवर झालेल्या आघातांचा दोष कोणाही एका माणसावर लादता येत नाही. त्या पोलिस सुपरिटेंडेंटने जे केले ते त्याचे कर्तव्यच होते. त्यात त्याचा काय दोष? दोष राज्यपद्धतीचा आहे. माणसांची सुधारणा करणे आवश्यक नसून ती पद्धत सुधारली पाहिजे.' पाहिलीत ना ही सारासार विचारणा किती सुक्ष्म आणि तरीही किती स्थूळ आहे. आणि ती आठवली तरी कशी अगदी वेळेवर.

हा अगदी वेळेवर. कारण ओड्वायर आणि डायर यांच्या वर्तनाविषयीच्या चौकशीमंडळात गांधीजींना ह्या महान सिद्धांतांचा किंचित विसर पडलेला दिसला, तसा आता पडला नाही. ओड्वायर आणि डायर ह्यांना गांधीनी दोष दिला आहे. मेण-मउ का होईना, पण त्यांना शिक्षा त्यांनी सांगितली होती आणि ओड्वायर, डायर ही माणसे होती असा सर्वसाधारण समज आहे. पण दोष माणसांचा नाही, पद्धतीचा आहे, ह्या महान तत्वाचा महात्म्याला त्या वेळी विसर पडला. वास्तविक डायरांनी वरिष्ठांचेच हुकूम पाळले म्हणून तो निर्दोष ठरावा. तथापी वरिष्ठांचे हुकूम पाळणे म्हणजे कनिष्ठ माणसे निर्दोषी पण ते वरिष्ठ तरी माणसेंच ना? म्हणून माणसाचा दोष नाही! राज्यपद्धतीचा दोष आहे! हे महान तत्व त्या वेळी महात्माजींना देखील झटकन न कळणे साहजिक होते. पण आता शेवटी ते आठवले, वेळच तशी आली. आता तरी सर्वांनी समजावे की हे कृत्य **Destatdly** आहे, दुसरे काय!

'माणसांचा काय दोष, ती राज्यपद्धत सुधारा!' हे तत्व आजच आठवले हेही एका परी बरे झाले. नाही तर त्या गोपीनाथ सहाच्या वेळेलाच गांधीजी **(ultimatum)** धाडते की 'गव्हर्नर साहेब! माणसांचा काय दोषः द्या त्या सहाला सोडून आणि चढवा त्या क्रांतिकारक पद्धतीला फाशी!' असे एखादे अंतिमोत्तर **(ultimatum)** गांधीजी धाडते तर गव्हर्नर जनरललाही ते ऐकावेच लागते. गांधीजींच्या अंतिमोत्तरांना गव्हर्नर जनरल कसे चळवचळ कापतात हे त्या प्रख्यात एक वार्षिक स्वराज्य युद्धाचे वेळी प्रत्ययास आलेलेच आहे. असे झाले असते तर सहा फाशीवरून सुटता आणि समाजाला आणखी एखाद्या 'सूडाचा ब्यादे'ची काळोखी लावीत फिरता! आता सॉंडर्सचा मारेकरी जर क्वचित फाशीबिशी चढू लागला, तर मात्र 'माणसाचा काय दोष? त्याला फाशी देणे म्हणजे ही हत्येच्या ब्यादीची वीण वाढविणे आहे' असला एखादा अर्ज गांधीजी करतात की काय एवढी भीती!

माणसांना कोणत्याही प्रकारे उत्तरदायी न धरता केवळ 'पद्धतीस' काय ते शासन करण्याची ही कुशाग्र क्लृप्ति जर माणसे व्यवहारात आणू शकतील तर सत्ययुग आजच उदयाला येईल. मनुष्य मनुष्याचे शत्रुत्व सोडून देईल. चोर पकडला जाताच त्यास गौरवाने निर्दोष म्हणून मुक्त करण्यात

येऊन त्याची ती चोरी तेवढी तुरुंगात टाकण्यात येईल. बिचारा सॉंडर्स! हा महान शोध जर तो जिवंत असता लागता तर तो किंवा त्याचे साथी देखील लालाजींच्या छातीपोटीवर लाठीचे तडाखे न मारता मनुष्य म्हणून त्यास सोडून त्यांचे भोवतालच्या पोकळ वातावरणात दडून बसलेल्या त्या अमूर्त सत्याग्रहाच्या 'पद्धतीच्या' पाठीवरच लाठीचे तडाखे लगावत! लखनौला सरकारी घोडेस्वार ती अनैर्बंधिक (**illegal**-बेकायदेशीर) मिरवणूक मोडण्यासाठी तीतील मनुष्यांना उधळून न लावता त्यांच्यातील ती मिरवणुक तेवढी निवडून काढून तिच्यावरच घोडे घालते. घोडे चालले नसते तर त्यांना चाबूक न लगावता त्यांच्यातील शिथिलतेला तेवढे चाबूक लगावते! कारण जसा मनुष्याचा दोष नसून ज्या पद्धतीचा तो अंगीकारतो तिचा दोष आहे, तसाच मंदपणा हा घोड्यांचा दोष नसून त्यांच्यातील शिथिलतेचा दोष आहे.

इतकेच नव्हे तर मूर्त मनुष्यांच्या व्यतिरिक्त जो वायुदेहधारी असा हा 'पद्धती'चा अमूर्त खवीस गांधीच्या सूक्ष्म दृष्टीस ह्या लेखाच्या शुभमुहूर्तावर दिसला, तो जर का एकदा सापडला तर मग मोठमोठी महायुद्धे देखील लढली जाऊनही त्यांत मनुष्यरक्ताचा एकही थेंब गळणार नाही. जर्मन महायुद्धात लाखो जर्मन लोक आणि इंग्लिशलोक समोरासमोर उभे राहून लाख लाख बंदुका सोडते पण कोणावर? -माणसावर नव्हे माणसांचा काय दोष? तर ज्या पद्धतीचा त्या **System** वर **British Imperialism** म्हणून ती पद्धती इंग्लिश सैन्याच्या डोक्यावर आकाशात वायुरुपाने तरंगत होती, तिच्यावर तेवढ्या आपल्या तोफा इंग्लिश माणांच्या डोक्यावर तीनचार मैल उंचीवर रोखून जर्मन लोक भडिमार चालविते आणि **militarism** म्हणून ती दुष्ट जर्मन लोकांच्या आडून दडून सर्व खोड्या करीत होती, तिला शासिण्यासाठी जर्मनीतील रहिवाशांना प्रत्यही केशरी भातांची पक्वान्ने खुशाल झोडीत बसता येईल इतकी अन्न सामग्री जर्मनीच्या नगरात पोचवीत राहून केवळ त्या 'पद्धती'ला मात्र एक तांदूळही मिळू नये म्हणून ब्रिटिश राष्ट्र **blocade** सिंधुबंदी करीत राहते!

असो. झाले ते झाले. आता पुढील महायुद्धात तरी ह्या मनुष्यावाचून जिवंत राहणाऱ्या 'पद्धत' नावाच्या मायावी राक्षसाचा चक्काचूर उडविता यावा यासाठी त्याचे राहण्याचे ठिकाण गांधीजींनी लवकरच प्रसिद्ध करावे. आजीबाईच्या पाळण्याजवळचे बायकी बागुलबोवा ज्या किल्ल्यात राहतात, त्यातच हा 'पद्धतबोवा' ही बहुधा राहत असलेला सापडेल! स्पष्ट ते स्पष्टच, सत्य ते सत्यच सांगता येते-

दि. १९ जानेवारी १९२९